






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका



# । तु का रा म ।

आवडीचीनपुरेधणीःप्रीतमनींबैसलीः॥१॥धु॥नीत
नवाकळवळाःमाझेबाह्यामधेंतोः॥२॥मुखसुखाभेटों
जालेंःहोमेवाढेपोटीचेंः॥३॥तुकाम्हणेब्रह्मानंदः
संतवृंदचरणांपेंः॥४॥छ॥छ॥छ॥छ॥छ॥छ॥छ॥छ॥
॥छ॥ ॥छ॥ ॥ ॥छ॥

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

**भाषा आणि जीवन**

। वर्ष १५ : अंक १ । हिवाळा १९९७ ।

अनुक्रमणिका

अनुक्रम



---

प्रकाशन : त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

संपादन-समिती : कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर.

संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक : कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे - ४११ ००७ (दूरध्वनी : ३५६०६१ / २१८७, निवास : ४३५६०३)

व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे - ४११ ००४ (दूरध्वनी : ३३३८६९)

पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर : आवरण पृष्ठ तीन पहा.



या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नितयकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

संपादकःकल्याण काळे प्रकाशक व मुद्रकःमराठी अभ्यास परिषदेसाठी-मृणालिनी शहा मुद्रण स्थळ : सहकार मुद्रणालय, ५४० गणेश पेठ पुणे २.

संपादकीय

# भाषा आणि करमणूक

विजया देव

शब्दकोडी सोडवणं ही आता एक फावल्या वेळची करमणूक झालेली आहे. लहानांपासून मोठ्यांपर्यंत आणि सुशिक्षितांपासून अगदी नाममात्र शिक्षण असलेल्यांपर्यंत सर्व थरांतले लोक त्यांत केव्हा ना केव्हा तरी रममाण झालेले दिसतात.

स्मृतीला ताण देणारा, भाषेविषयी दक्ष बनवणारा असा हा विरंगुळ्याचा प्रकार वृत्तपत्रं, वृत्तपत्रांच्या पुरवण्या, नियतकालिकं, सांज दैनिकं या सगळ्या छापील माध्यमांमधून आपल्या भेटीला येतो.

या शब्दकोड्यांमध्ये विषयांनुरूप विविधता असते. विज्ञान, साहित्य, क्रीडा अशा विशिष्ट क्षेत्रांतील शब्दांवर आधारलेली, सर्वसामान्य, बालवाचकवर्गासाठी त्यांचं अनुभवविश्व, भाषाप्रभुत्व लक्षात घेऊन केलेली अशी अनेक तऱ्हेची शब्दकोडी तयार केली जातात. ही कोडी सोडविण्यासाठी शब्दकोड्याचं छापील पान आणि चालणारं बॉलपेन किंवा पेन्सिल (प्रवासात बहुधा सहप्रवाशाकडून मागून घेतलेली) याव्यतिरिक्त काही लागतही नाही. प्रवासात तर एकट्यानं चौकटी भरता-भरता आसपासची चार डोकीही अनाहूतपणे कार्य सिद्धीला नेतात- ती गोष्ट निराळी.

अशी शब्दकोडी तयार करणं हाही एक विशेष कौशल्याचा प्रांत आहे. काळ्या-पांढऱ्या भरीव - पोकळ चौकटींचा चौकोन आणि त्याखाली अभिप्रेत शब्दांचा मागोवा घ्यायला मदत करणाऱ्या सूचकांच्या याद्या (उभे शब्द - आडवे शब्द) हेच एक स्थूल स्वरूप आपल्याला दिसत असलं, तरी त्यामागे ते कोडं तयार करण्याची कल्पनाशक्ती, शब्दकोशांचं सहकार्य, शब्दांतल्या अक्षरांची परस्परांतील गुंतवणूक ओळखून त्यांची रचना करणं असे अनेक घटक असतात. शब्दकोडी नियमितपणे सोडवून, त्यात निष्णात बनणाऱ्यांनी त्यांच्या रचनेचाही एखादा उपक्रम करून बघायला हरकत नाही. (कधी कधी कोडं सोडवताना एखादा शब्द फार अडेलतट्टूपणा करतो आणि आपल्याला त्यातून मोकळं म्हणून होता येत नाही. अशा वेळी शेवटी सात्विक संताप येतो, तो रचनाकाराचाच. जर आपणच एखादी रचना करून बघितली, तर त्या रचनाकारावर एक प्रकारचा सर्जक सूड घेता येईल, नाही का?)

भाषिक करमणुकीच्या या प्रकारात शब्दकोडं, लेखणी एवढंच का असेना, पण बाह्य साधन आहेच. पण भेंड्या, असंबद्ध बोलणं, विनोद सांगणं यांत तर तेही नाही. कारण हे सर्व प्रकार निव्वळ मौखिक आहेत. भाषिक कौशल्याचाच वापर मनोरंजनासाठी करून घेणं ही माणसाची एक पुरातन खासियत आहे.

अशी करमणूक शोधण्यामागे, करमणुकीचे प्रकार शोधण्यामागे मुळात 'कंटाळा' ही गोष्ट प्रेरक ठरते, असं म्हटलं, तर ते खरंही वाटणार नाही. पण कित्येकदा 'कंटाळा आला' हे परवलीचे शब्दच आपल्याला कामाला लावतात. कारण कंटाळा आला, की तो घालवायचा कसा, याचा विचार आधी ज्याचा त्याला करावा लागतो. तो घालवायचे वेगवेगळे मार्ग सुचायला लागतात. कधी तरी कंटाळा येणं ही कल्पनाशक्तीला खाद्य पुरवणारी गोष्ट आहे. विशिष्ट प्रमाणातला कंटाळा आपल्याला 'चेतना' देतो. क्रियाशील बनवतो, मनाला, शरीराला अस्वस्थ करतो. त्यातून मग वेगवेगळे मार्ग सुचायला लागतात. सध्या मात्र आपल्याला असं दिसतं, की आपल्याला कंटाळा येऊच न देण्याचा चंग प्रसारमाध्यमांनी बांधलेला आहे. आपण गुदमरून जाऊ, इतके तयार करमणुकीचे प्रकार आणि उपभोगाचे मार्ग यांचा चक्रव्यूह त्यांनी आपल्याभोवती तयार केलाय्. साधा 'भेंड्या' हा निरुपद्रवी खेळच पाहा ना! अंताक्षरी झाल्यावर तिचा ताबा इलेक्ट्रॉनिक माध्यमांनी घेतलाय् आणि अहमहमिकेनं भेंड्या लावणारे, चढवणारे झालेत. स्पर्धक आणि आपण सगळे दुरून गंमत बघणारे 'अक्रियावान' प्रेक्षक. एका पूर्वापार चालत आलेल्या क्रीडा-प्रकाराला आधुनिक तंत्रज्ञानानं दिलेला उजाळा या दृष्टीनंही या अंताक्षरीकडे बघता येईल. पण माझा आक्षेप या ठिकाणी 'अप्रत्यक्ष करमणुकीचा बाहुला उपभोक्ता बनणं' एवढ्यापुरताच मर्यादित आहे.)

आणखी एक गमतीचा प्रकार म्हणजे 'असंबद्ध बोलणं'. एकजण जे विधान करतो, त्याच्याशी दूरान्वयानंही कसलाही संबंध नसलेलं विधान पुढच्यानं करायचं आणि त्याच्या विधानाशी पूर्णपणे असंगत विधान त्याच्यापुढच्यानं करायचं, हा तो खेळ. भाषिक आविष्कारात आपण तार्किक, सुसंगत मांडणीशी, विचाराशी किती बांधलेले असतो, याचा साक्षात्कार तेव्हा होतो आणि या सुसंगततेपासून लांब जाणं किती कष्टाचं असतं, कल्पकतेचं असतं, याचीही कल्पना अशा वेळी येते. आपली कल्पनेची भरारी, दावं तोडून चौखूर उधळण्याची शक्ती जेवढी जास्त, तेवढी या खेळात गंमत जास्त. शाळकरी वयातल्या ताज्या मनाच्या विद्यार्थ्यांमध्ये त्याची रंगत अधिक वाढते. पण हा प्रकार फारसा दिसत मात्र नाही.

- आणि सध्या हमखास हसवणारा, चार डोकी एकत्र आणणारा मनोरंजनाचा प्रकार म्हणजे विनोद सांगणं. तेही हत्तीमुंगीचे. बलाढ्य आणि मस्तवाल, अवाढव्य आणि महाकाय हत्ती आणि नगण्य, किरकोळ, चावण्याव्यतिरिक्त उपद्रव नसलेली, क्षुद्र मुंगी यांची सांगड ज्यांनी कोणी घातली आणि त्यातून बाष्कळ विनोद निर्माण केले, त्यांच्या

कल्पनाशक्तीला दाद दिलीच पाहिजे. सगळ्याच बाबतींत असंबद्ध असलेल्या या दोन घटकांना एकत्र आणून, निखळ करमणूक साधणारे हे विनोदी चुटके म्हणजे आजच्या काळातलं लोकवाङ्मयच आहे.

हत्तीला येताना पाहून मुंगी झाडामागे का लपते? त्याला पाय घालून पाडायला.

वेळ जावा, ताजंतवानं व्हावं, हास्याचा शिडकावा करावा, यासाठी भाषिक कौशल्यं वेगवेगळ्या प्रकारे वाकवावी, हेच या सर्व भाषिक करमणुकींमागचं उद्दिष्ट आहे.

**सुप्रिया अपार्टमेंट्स, ६१/१४, एरंडवणे, पुणे ४११००४.**



---

## सुप्रि-या! सुप्रि-जा!

माझं शालेय शिक्षण मराठीतून झालं. माझ्या नवऱ्याचं इंग्रजीतून. आमच्या दोन्ही मुली इंग्रजी माध्यमाच्या शाळेत जातात. मोठी उत्पला सात वर्षांची. शब्दांच्या जडणघडणीचा ती स्वतंत्रपणे विचार करत असावी असं वाटण्यासारखी शब्दांची फोड आणि मोडतोड ती करत असते.

'सावली' हा शब्द आणि त्याचा अर्थ तिला ठाऊक आहे. 'ही माझी सावली' असाच उल्लेख ती एरवी करते. पण एकदा तिने फ्रॉकऐवजी पँट आणि टी-शर्ट असा पोषाख केला तेव्हा ती म्हणाली, 'आज माझा सावला पडणार!'

परवा तिला कांजिण्या आल्या. तेव्हा तिने मला विचारलं, 'कानजिण्यांसारख्या नाकजिण्या पण येतात का?'

एकदा वॉशिंग बेसीनमध्ये केस पडलेले तिला दिसले तेव्हा ती वैतागून म्हणाली, 'अग आई, हे बेसीन आहे की केसीन?'

तिच्या धाकट्या बहिणीच्या नावाची गंमत करून हसण्याचा त्या दोघींचा खेळ नेहमी चालतो. धाकटीचं नाव सुप्रिया. उत्पला तिला लांबून बोलावते, 'सुप्रि-या!' सुप्रिया जवळ आली की ही म्हणते, 'सुप्रि-जा!'

**प्रेषक - उज्ज्वला बर्वे, मनीषा पार्क, डहाणूकर कॉलनी, रस्ता क्र. २, कोथरूड, पुणे ४११०२९**

# संदिग्धतेचे प्रकार, कारणे आणि निःसंदिग्धीकरण

शैलेश सदाशिव पुंडलीक

संदिग्धतेचे मूळ कारण त्या वाग्व्यवहारामध्ये मान्य झालेली गृहीते[१] माहीत नसणे; किंवा एका वाग्व्यवहाराची गृहीते दुसऱ्या वाग्व्यवहारासाठी मान्य आहेत, असे गृहीत धरणे; किंवा ज्यांचा त्या वाग्व्यवहारांशी काहीही संबंधच नाही, अशी सुद्धा गृहीते त्यात मान्य आहेत, असे वाटणे, या स्वरूपाचे असते.[२] गृहीतांची संख्या आणि त्यांच्यामागे असलेल्या गृहीतांची संख्या जसजशी वाढत जाईल, तसतशी त्यांची Complexity वाढत जाऊन संदिग्धताही जास्तजास्त वाढत जाईल. हे मूलतत्त्वीय (axiomatic) सत्य मानायला हवे. जिथे दोन भाषकांतील गृहीतांचा सट एकच असतो किंवा एकच आहे, असे वाटते, तिथे संदिग्धता नसते किंवा निदान तसे वाटते. त्यामुळे गृहीतांची संख्या आणि Complexity या निकषांवर संदिग्धतेचे स्वरूप, रचना आणि निःसंदिग्धीकरणाची प्रक्रिया यांची वर्गवारी करावी, असे वाटते.

या विवेचनातही काही गृहीतांचा सट अध्याहृत आहे, असे मानलेले आहे. त्यांना निकषांचे स्वरूप देता येईल, की नाही, हे ठरविणे जरा अवघड आहे; पण इतर काहीही म्हटले, तरी निःसंदिग्धीकरणाच्या प्रक्रियेचे स्वरूप समजायला त्यांचा फार उपयोग होतो, हे यापुढच्या विवेचनात स्पष्ट होईल.

एक म्हणजे, वाग्व्यवहाराच्या सर्वसामान्यपणे ज्ञात असलेल्या स्वरूपात (१) ध्वनी आणि ध्वनिसमूहांची रचना (२) रूपिमे आणि वाक्य, वाक्यखंड यांच्या रचना (३) त्या वाग्व्यवहारामध्ये अभिप्रेत असणारा अर्थ, (४) त्या सर्व वाग्व्यवहारामागे असणारा गृहीतांचा सट आणि (५) त्या वाग्व्यवहाराचा संदर्भ असे मूलघटक आढळतात. या सर्व मूलघटकांच्या परस्परसंक्रिया (interaction) आणि त्यांची एकत्रित व्याप्ती या सर्वांना मिळून एकच 'प्रकरणसापेक्षता'[३] अशी संज्ञा वापरावी, म्हणजे विवेचनाच्या ओघात प्रत्येक घटकाचा निरनिराळा उल्लेख - आवश्यकता नसल्यास, न करता, ते अध्याहृत धरता येतील.

या निबंधाच्या विवेचनाचा प्रमुख मुद्दा असा आहे की, एक वाग्व्यवहार काही कारणांमुळे संदिग्ध होत असेल, तर त्याचे निःसंदिग्धीकरणही त्याच्या प्रकरणसापेक्षतेच्या कक्षेतच व्हायला हवे. त्यासाठी दुसऱ्या वाग्व्यवहाराच्या प्रकरणसापेक्षतेचा वापर करण्याची वेळ आली, तर खऱ्या अर्थाने त्याचे निःसंदिग्धीकरण झालेले आहे, असे म्हणता

येणार नाही. हा विषय आणि त्याची औपपत्तिक चर्चा ही वाक्यरचनासापेक्ष संदिग्धतेच्या विवेचनात प्रकर्षाने करावी लागेल.

मराठीतील संदिग्धता या शब्दाच्या अर्थाने इंग्रजीत ambiguity, vagueness, indeterminacy इत्यादी शब्द वापरण्याची पद्धत आहे. त्यांतील काहींचा विचार 'भाषेची यदृच्छता' या निबंधात झालेला आहे.[४] संदिग्धतेचे प्रकार, त्यांचे निःसंदिग्धीकरण यांची औपपत्तिक चर्चा करीत बसण्यापेक्षा काही प्रत्यक्ष उदाहरणे विश्लेषित करून, त्यांमागील सत्यांचा मागोवा घेत जाणे हे जरा जास्त श्रेयस्कर आहे. अशा उदाहरणांचे आणि त्यांमागची तत्त्वे यांचा विचार करता, ती पाच गटांमध्ये वर्गीकृत करता येतील, असे दिसते. ते असे :

१) शब्दसापेक्ष संदिग्धता
२) पदरचनासापेक्ष किंवा पृष्ठतलीय (surface structure) संदिग्धता
३) भ्रमसापेक्ष किंवा गृहीततलीय संदिग्धता
४) संदर्भसापेक्ष / प्रकरणसापेक्ष संदिग्धता (Semantic / pragmatic)
५) वाक्यरचनासापेक्ष / निम्नस्तरीय (deep structure) संदिग्धता

**१) शब्दस्तरीय संदिग्धता**

शब्दस्तरीय संदिग्धतेचे दोन प्रकार होतात, असे दिसते. एक म्हणजे, एका शब्दाचे दोन किंवा अनेक अर्थ आपत्तिसिद्धतेने (accidentally) उपलब्ध असणे. या घटनेला इंग्रजीत homonymy / homophony असे म्हणतात. यातील शब्दांचे अर्थ हे एक तर आपत्तिसिद्धपणे आणि यदृच्छतेने उपलब्ध झालेले असतात किंवा त्यांना आघात, वाक्यरचनेतील स्थान, लय (tone) वगैरेंसारख्या प्रकरणसापेक्ष प्रक्रियांनी अर्थ प्राप्त झालेला असतो. दुसरे म्हणजे, एखाद्या शब्दाचा मूळ अर्थ काही साहचर्ये (associations), आलंकारिक उपयोग, विस्तार (extension) इत्यादींमुळे बदललेला असतो. इंग्रजीत relative या शब्दाने 'नातेवाईक' आणि 'सापेक्ष' असे दोन अर्थ व्यक्त होतात; त्यांतील एक नाम असून, दुसरा विशेषण आहे, हे आपत्तिसिद्ध आहे. Punt शब्दाचे 'bet', 'a shallow boat', 'kick a football' तर corn या शब्दाचे 'Preserve in salt', 'grain, seed of any plant', 'hardened skin' असे अनेक अर्थ होतात. त्याचप्रमाणे Pulse, pump, fond, fly, exact वगैरे शब्दांचेही अनेक अर्थ होतात. इंग्रजीतील reject हा शब्द नाम आहे, की क्रियापद आहे, हे त्यातील स्वराघातावर ठरते. उदा. 'reject'. जेव्हा पहिल्या syllable वर आघातित असेल, तेव्हा ते नाम असून ते दुसऱ्या syllable वर आघातित असेल, तर ते क्रियापद होते. याचप्रमाणे subject, object, refuse, इत्यादी अनेक शब्दांना आघात आणि वाक्यातील त्यांचे पहिले किंवा दुसरे स्थान यांच्यानुसार त्यातील संदिग्धतेचे निराकरण करता येते.

शब्दस्तरावरील ध्वनी आणि अर्थ यांचे मूळ संबंध पूर्णपणे यदृच्छ असताना, त्यांच्या अभ्यासात फारशा उद्बोधक गोष्टी आढळत नाहीत. याचे उत्कृष्ट उदाहरण शंकरपार्वतींच्या

संवादात आढळते. घरी आलेल्या शंकर भगवानांना दार उघडण्यापूर्वी पार्वतीमाईंनी 'कोण आहे', असा प्रश्न विचारल्यावर त्यांची चेष्टा करण्यासाठी शंकरभगवानांनी स्वतःचा उल्लेख करण्यासाठी अनेकविध शब्द आणि शब्दरचनांचा वापर केला, पण पार्वतीमाई त्यांच्याहूनही जास्त चलाख असल्याने (स्वाभाविकच आहे म्हणा!) त्यांनी त्या शब्दांचे भिन्न भिन्न अर्थ करून शंकरभगवानांना निरुत्तर केले. ते असे :

**कस्त्वं शूली मृगय भिषजं नीलकण्ठः प्रियेऽहम्**
**केकामेकां कुरु पशुपतिर्नैव दृश्ये विषाणे।।**
**स्थाणुर्मुग्धे न वदति तरुर्जीवितेशः शिवायाः**
**गच्छाटव्यामिति हतवचाः पातु वश्चन्द्रचूडः।।**

या संभाषणात शूली (शूल धारण करणारा / पोटशूळ असणारा) नीलकण्ठ (निळा कंठ असणारा शंकर / मोर), पशुपति (पशूंचा नायक, स्वामी म्हणजे बैल / शंकर), स्थाणु (स्थिर असणारा म्हणजे शंकर / वृक्ष), शिवेचा जीवितेश (पार्वतीचा / कोल्हीचा जीवितेश म्हणजे शंकर / कोल्हा) इत्यादी शब्दांचे विविध अर्थ लावताना पार्वतीमाईंनी त्यांतील विपरीत पर्याय तेवढे व्यवस्थित निवडून, शंकर भगवानांना वैद्याकडे जायला, केकाध्वनी करायला (मोर), अरण्यात जायला (कोल्हा) सांगितले; तसेच शिंगांचा अभाव (बैल), आणि भाषाशक्तीचा अभाव (वृक्ष) यांचाही उल्लेख केला. त्यामुळे शंकर भगवान निरुत्तर होणे स्वाभाविकच म्हटले पाहिजे.

या संभाषणातील सर्वच शब्द यदृच्छ आहेत, असे नव्हे. उदा., शूली हा शब्द 'अस्ति प्रशस्तः शूलो यस्य सः।' असा व्याकरणशुद्ध नियमाने तयार झालेला आहे; जीवितेश हा आलंकारिक आहे; तर नीलकण्ठ हा extension च्या नियमात येऊ शकतो.

तथापि, व्याकरणाचे नियम, विस्ताराचे नियम आणि व्याप्ती, आलंकारिकतेचे कार्य आणि स्वरूप या सर्वच गोष्टी यदृच्छतेच्या सदरात जमा होतात. उदा.,

(१) I like her cooking.

या वाक्यातील कुकिंग हा शब्द cook हा मूळ शब्द आणि ing हा प्रत्यय यांनी घडलेला आहे. तो व्याकरणशुद्ध नियमाने तयार झालेला असल्याने त्यात यदृच्छता नाही, असे म्हणावे लागेल. प्रत्यक्षात त्याचा अर्थ करताना स्वैपाक करण्याची क्रिया, प्रत्यक्ष पाक (म्हणजे शिजवलेल्या वस्तू) असे अनेक अर्थ होतात. ते असे :

(१) अ) I like her cooking = her style of cooking (पद्धत)
ब) = The things she has cooked (पदार्थ)
क) = the fact that she is cooking (क्रिया)
i.e. not doing anything else.
ड) = only her cooking but nothing else (व्यक्तित्व)
इ) = The fact that she is being cooked(?)

इ.इ. अर्थ extension ने उपलब्ध होतात. तसेच

(२) अ) What's cooking = ⎤ some conspiracy is

ब) Something's being cooked up = ⎦ being hatched.

तसेच

(३) I Like cooking = the activity of cooking.

(४) I like cooking = the activity of cooking but not much else.

असे विविध अर्थ आढळून येतात. त्यांतील अनेकांची व्यवस्था आघात आणि विस्तारांच्या आधारावर लावता येते. पण (१) इ) मध्ये व्यक्त होणारा अर्थ हा कोणत्या नियमांनुसार निर्धारित करता येईल? बरे, cooking शब्दाने 'कट करणे' हा अर्थ आलंकारिकतेमुळे २अ), २ब) मध्ये व्यक्त होतो, हे ठीक. पण मुळातच कटाचा आणि शिजविण्याच्या क्रियेचा संबंध हा बादरायण संबंधासारखाच आहे. तसे नसते, तर हिंदी भाषेतही 'षड्यंत्र' पकले असते. पण षड्यंत्र 'पकत' नसते, ते 'रचा जाता है।'

तेव्हा खऱ्या अर्थाने व्याकरणीयता, आलंकारिकता या गोष्टी सुद्धा यदृच्छतेचा मागोवा घेतच चालतात. संस्कृतमध्ये 'धारण करणारा' या अर्थाने इन् हा प्रत्यय वापरला जातो; इंग्रजीत फ्रेंचप्रमाणेच एखादी क्रिया करणाऱ्या पुरुष व्यक्तीसाठी -er हाच प्रत्यय असतो. उदा., dancer, danser. पण स्त्रीसाठी मात्र इंग्रजी -erच वापरते. किंवा ess वापरते, तर फ्रेंच euse, -ice वापरते उदा., dancer, actress, तर फ्रेंच danseuse, actrice, इ.इ. मराठीत तर तीनही लिंगांसाठी आ, ई, ए हे स्वतंत्र प्रत्यय आहेत उदा., करणारा / री / रे. हे मान्य, की हे नियम स्वीकारल्यानंतर ते काटेकोरपणाने पाळले जातात. इंग्रजीत भूतकाळ दाखविण्यासाठी -ed प्रमाणे स्वरबदल (उदा., bring, brought), शून्य बदल (उदा. put-put), रूपिमबदल (उदा., be-was) वगैरे वापरले जातात. पण -ing कधीही वापरला जात नाही. पण भाषेची नियमबद्धता म्हणजे निसर्गाची / विज्ञानाची नियमबद्धता नव्हे. त्यात येणारा कार्यकारणभाव हा मानवी सार्वमतामुळे आलेला असतो.[६]

शूली हा शब्द आणि कुकिंगसारखा शब्द यांच्यामुळे निर्माण होणाऱ्या संदिग्धतेत काही साम्ये आणि काही फरक आहेत. एका शब्दाचे विविध अर्थ वापरात आणून निर्माण होणारी संदिग्धता ही फक्त दुसरा निःसंदिग्ध (वाटणारा) शब्द किंवा शब्दरचना वापरूनच नष्ट करता येते. पण त्याचा अर्थ आपण त्या शब्दाच्या प्रकरणाच्या बाहेर जात आहोत, असा होतो. त्यात काही धोका नाही, असे वाटू शकते. पण प्रत्यक्षात निःसंदिग्ध वाटणाऱ्या शब्दाच्या आणि मूळ शब्दाच्या प्रकरणात एकत्ववृत्ती दाखविता आली, तरच ते सममूल्य होऊ शकतात. अन्यथा प्रत्येक शब्दाला सुद्धा (यदृच्छतेमुळे) अनेक अर्थ व्यक्त करणे शक्य असल्यामुळे (म्हणजेच त्यांची प्रकरणे वेगळी होत असल्याने) शब्दांच्या अर्थांचे juggling करण्याचा हा खेळ केवळ बुद्धीच्या मर्यादांवरच अवलंबून राहील. म्हणजे पार्वतीमाईसारखा खेळाडू तो खेळ कितीही काळ खेळू शकेल. दुसऱ्या शब्दांत सांगायचे, तर भाषेच्या वापरातील संदिग्धता नष्ट करणारी दुसरी रचना मिळेपर्यंत ती नष्ट होणार नाही.

पण असे म्हटल्याने आपण फार काही औपपत्तीय प्रगती केली, असे वाटत नाही.

Cooking सारख्या शब्दामध्ये जी संदिग्धता आढळते, ती तशी फारशी त्रासदायक नसते. एक तर तिला नाही म्हटले, तरी बरीच नियमबद्धता असते; आणि बऱ्याच वेळा तर तिचे निःसंदिग्धीकरण करणारी मूलद्रव्ये सुद्धा तिच्याबरोबरच वाक्यात उपस्थित असतात. उदा.,

(५) अ) I like her cooking but nothing else about her (व्यक्तित्व)

ब) I like her cooking but little else that she does (पद्धत)

क) I like her cooking but I could not eat anything yesterday (पदार्थ)

ड) I like her cooking, she could be doing worse (क्रिया) इ.इ.

खरे म्हणजे, अशी निःसंदिग्धीकरणाची क्रिया अनेक वेळा आधीच केलेली असते. बऱ्याच वेळा संदिग्धता ही हेतुतःच निर्माण केलेली असते. पण महत्त्वाचे म्हणजे, तिचे निःसंदिग्धीकरण हे त्या वाक्याच्या प्रकरणावरच केले जाते. त्यामुळे तिच्यात यदृच्छता डोकावत नाही. या प्रकारची संदिग्धता औपपत्तिकतः महत्वाची आहे, असे म्हणायला हवे.

सरतेशेवटी यदृच्छता / भाषासापेक्षता यांचा थोडा जरी विचार केला, तरी असे आढळते, की भाषाव्यवहाराच्या अर्थमर्यादा भाषकांच्या साहमत्याने ठरविल्या जातात, असे आपण जेव्हा म्हणतो, तेव्हाच त्यात संदिग्धतेचा जन्म झालेला असतो. माझ्या अनुभूतिविशेषाप्रमाणे मी 'क्ष'ची व्याख्या 'क्ष' अशी करणे हे ठीक आहे. पण इतर भाषकसुद्धा माझ्याप्रमाणेच व्यक्तिविशेष (individual) असल्याने ते त्यांच्या त्यांच्या अनुभूतिविशेषांप्रमाणे 'क्ष'ची व्याख्या करतील. पण त्यांचे अनुभूतिविशेष आणि माझे अनुभूतिविशेष एक असतील, तरच तेही त्याची 'क्ष' अशी व्याख्या करू शकतील, पण तसे होण्यासाठी प्रत्येकाच्या अनुभूतीत तेच घटक, त्याच मर्यादेत, त्याच गुणधर्मविशेषांसह (Same elements, same range and same characteristics) उपलब्ध व्हायला पाहिजेत. पण ते व्याख्यातः (definitionally) अशक्य आहे. कारण तसे म्हटले तर आम्ही व्यक्तिविशेष आहोत, हे म्हणण्याचा आधारच समूळ नष्ट होतो.

अनुभूतीच्या विशेषत्वामुळे संप्रेषणच अवरुद्ध झाले, असे व्हायला नको, म्हणून त्या अनुभूतीतील सामान्य, पुन्हा पुन्हा आढळणारे, सर्वांना जाणवणारे असे घटक घेऊन त्यांचा सट प्रतीकात्मकतेने वापरता येतो. तो अपूर्ण[ं] असतो आणि अमूर्तही असतो आणि वादातीतही नसतो. त्यामुळे अशी निर्माण होणारी संदिग्धता नष्ट होणारी नव्हेच, असे म्हणायला तत्त्वतः हरकत नाही. सुदैवाने प्रत्यक्ष जीवनातील भाषाव्यवहारात इतके काटेकोर विचार करण्याची पद्धत नाही. 'मला गरम पाणी हवे आहे' यातील संदिग्धता 'मला चाळीस अंश सेल्सिअस तापमानाचे पाणी हवे आहे', असे म्हटल्याने नष्ट होते, असे म्हणण्यात जो भाबडेपणा आहे, तोच भाबडेपणा भाषेच्या या नियमांचे काटेकोर पालन करून, सामान्य भाषाव्यवहारातील संदिग्धता नष्ट करता येते, असे मानण्यात आहे.

भाषावैज्ञानिकाच्या अभ्यासाचे नियम वेगळे आणि प्रत्यक्ष भाषाव्यवहारातील रचनांचे नियम वेगळे, हे सत्य डोळ्यांआड झाले, की मग अशा निसरड्या निष्कर्षांचा सुकाळ होतो. तेव्हा भाषावैज्ञानिकाने अशा परिस्थितीत प्रत्यक्ष भाषाव्यवहाराचे नियम अभ्यासायला हवेत.[८]

## २) पृष्ठतलीय (Surface Structure) संदिग्धता.

पृष्ठतलीय संदिग्धता ही वाक्यरचनेच्या काही चमत्कारिक क्लृप्त्यांमुळे जन्माला येते. पण त्या वाक्यातीलच घटकांच्या पुनर्रचनेमुळे ती निर्मूल करता येते. याचा अर्थ असा, की ती पूर्णपणे प्रकरणसापेक्ष असते. यापूर्वीच चर्चेत घेतली गेलेली काही उदाहरणे वापरून हा मुद्दा स्पष्ट करता येईल.

हॉकेटप्रभृती संरचनावादी भाषावैज्ञानिकांनी असे दाखविले आहे, की वाक्यातील कोणता घटक त्या वाक्यातील दुसऱ्या कोणत्या घटकाशी संबंधित आहे, त्यावरून त्या वाग्व्यवहाराचे अर्थ बदलत राहतात. उदा., stout major's wife किंवा Old men and women या वाक्यखंडांमध्ये एक मूलभूत संदिग्धता आढळते. stout (म्हणजे लठ्ठ) कोण आहे? major, की त्याची बायको? Old कोण आहे, पुरुष, की स्त्रिया, की दोघेही? त्याचे विश्लेषण करताना असे दिसते, की the stout major's wife मध्ये the, stout, major, 's, wife असे पाच, तर the old men and women मध्ये the, old, men, and, women असे पाच रूपिम आढळतात. काही रूपिमांचे निसर्गतः एकमेकांबरोबर साहचर्य आढळते. उदा., 's हा रूपिम the या रूपिमाबरोबर आढळत नाही; तो major किंवा wife याच रूपिमांच्या सान्निध्यात आढळेल. The हा रूपिम सुद्धा नुसता stout सह आढळेल, असे क्वचितच होईल; तोसुद्धा major किंवा wife या रूपिमाबरोबर नैसर्गिक affinity दाखवितो. राहता राहिले major आणि wife. त्यांत wife's major ही रचना व्याकरणदृष्ट्या ठीक आहे; पण व्यवहारदृष्ट्या मान्य होणारी नाही. या सगळ्या गोष्टींचा विचार करून संरचनावादात त्यांचे परस्परसंबंध दाखविण्याचा प्रयत्न केला जातो. तो असा :

The stout major's wife.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| the | stout | major | 's | wife | सर्व रूपिम विश्लेषित रूपात |
| the | stout | major's | | wife | major आणि 's संश्लेषित |
| the | stout major's | | | wife | stout आणि major संश्लिष्ट. major लठ्ठ होतो. |
| the | stout | major's wife | | | major आणि wife संश्लिष्ट. wife लठ्ठ होते. |
| the stout major's wife | | | | | सर्व रूपिम संश्लेषित. |





अनुक्रमणिका

याप्रमाणे भाषाव्यवहारातील कोणते रूपिम एकमेकांचे नैसर्गिक सहचारी आहेत, हे पाहून, त्यांचे immediate constituents या पद्धतीने विश्लेषण करता येते. पण आताच पाहिल्याप्रमाणे stout हा रूपिम major आणि wife या दोन्ही रूपिमांबरोबर तितक्याच सहजतेने सहचारी होऊ शकतो, असे म्हटल्यावर संदिग्धतेचा धोका निर्माण होतो.

हाच धोका old men and women मध्ये त्याहूनही जास्त प्रकर्षाने जाणवतो. Old हा रूपिम men आणि women या दोन्ही रूपिमांबरोबर तितक्याच सहजपणे साहचर्य करू शकतो. त्यामुळे वृद्ध नेमके कोण आहेत, men, की women, हा एक मोठाच विवादास्पद मुद्दा निर्माण होतो. त्याचे अर्थ सांगण्यासाठी पुढीलप्रमाणे निर्देशन करावे लागेल.

(६) अ) old men and women = men आणि old संश्लिष्ट

ब) = old आणि women संश्लिष्ट

क) = old आणि men आणि women सर्वच रूपिम संश्लिष्ट

या वाक्यखंडातील old या रूपिमाचे इतर रूपिमांशी जे संबंध आहेत, तदनुसार त्याचे अर्थ बदलतात.

आता या रचनांमधील संदिग्धता ही यदृच्छतेच्या पायावर उभी नाही, हे स्पष्टच आहे;[१] कारण ती व्याकरणशुद्धतेच्या पायावर आधारलेली आहे. ती व्याकरणाच्या नियमांच्या अपूर्णतेमुळे आलेली आहे, असे म्हणणे हे सुद्धा बरोबर नाही. कारण व्याकरणामध्ये निःसंदिग्ध रचना करण्याचे सामर्थ्य असताना आहेत, तेच रूपिम वापरून, त्यांची यथायोग्य मांडणी करून, त्यात निःसंदिग्धता येऊ शकते, हे दाखविता येते. उदा., major stout नसून, त्याची wife हीच stout आहे, हे दाखविण्यासाठी,

(७) The major's stout wife

असे म्हणता येते. याउलट major हाच stout असेल तर,

(८) The wife of the stout major म्हणजेच The stout major's wife

अशी वेगळी रचना मांडता येते.

याचप्रमाणे old men आणि women यांच्यासाठी

(९) अ) men and old women फक्त स्त्रिया वृद्ध

ब) women and old men फक्त पुरुष वृद्ध

क) old (men and women) पुरुष आणि स्त्रिया दोन्ही वृद्ध

म्हणजेच old men and old women अशा स्वरूपाच्या रचना करणे शक्य आहे.

तेव्हा या प्रकारच्या रचना उपलब्ध असताना संदिग्धता सहज नष्ट करता येते. काही ठिकाणी शब्दतलीय संदिग्धता ही पृष्ठतलीय संदिग्धतेची सहचरी आहे. असे आढळते. पण त्या ठिकाणी सुद्धा उपलब्ध असणाऱ्या रूपिमांचाच वापर करून काही वेगळ्या प्रकारे त्यांची रचना केल्यास निःसंदिग्धीकरण शक्य होते, उदा., दमयंतीशी बोलणारा हंस तिला आश्वासन देतो, की तिचे मनोरथ कितीही अवघड असले, अगदी लंकागमनाइतके अवघड

असले, तरी ते पुरे करणे त्याला शक्य आहे. तेव्हा दमयंती त्याला सांगते, की तिला लंकेची इच्छा नाही. हे सांगताना कवी हर्षाने

१०) अ) चेतो न लङ्कामयते मदीयं

असे लिहिलेले आहे, ते त्याचा अर्थ करण्यासाठी

ब) चेतो नलं कामयते मदीयं - मला नलाची इच्छा आहे.

क) चेतो न लङ्कामयते मदीयं - मला लंकेची इच्छा नाही.

यांपैकी कोणत्या पर्यायाची निवड करावी, असा प्रश्न येतो. त्याचे गमतीदार उत्तर असे आहे, की हे दोन्ही पर्याय तिथे अन्वय पद्धतीने घेणे आवश्यक आहे. म्हणजे दमयंतीला नल हवा असल्याने तिला लंकेची इच्छा नाही किंवा तिला लंकेची इच्छा नसून, तिला फक्त नल हवा आहे. ही संदिग्धता pragmatic स्वरूपातली आहे.

पण पृष्ठतलीय आणि शब्दस्तरीय संदिग्धतासुद्धा त्या वाक्यखंडात आहेत त्याच रूपिमांचा वापर करून नष्ट करता येते. (११) (अ) न मदीयं चेतो लङ्कामयते= मला लंकेची इच्छा नाही (ब) नलं, मम चेतः कामयते= मला नलाची इच्छा आहे. याच प्रकारे मराठीत औषध न लगे मजला याचे विश्लेषण करता येते.

महत्त्वाचा मुद्दा असा आहे, की यांपैकी कोणत्याही उदाहरणातील संदिग्धता नष्ट करण्यासाठी त्या वाक्यखंडाच्या प्रकरणाच्या बाहेर जावे लागलेले नाही. The stout major's wife मध्ये सुद्धा the wife of the stout major असे म्हणताना of हा रूपिम 's रूपिमाला सममूल्य आणि समकक्ष आहे. म्हणूनच वापरला, त्यामुळे काही वेगळे प्रकरण विचारात आले, असे होत नाही.

**(३) संदर्भसापेक्ष संदिग्धता : Semantic / Pragmatic**

या प्रकारची संदिग्धता ही त्या वाक्प्रयोगातील रूपिमांच्या आधो मिळणाऱ्या माहितीच्या बाहेर जाऊनच निःसंदिग्ध करता येते. त्यामध्ये वापरले जाणारे शब्द हे पूर्णपणे त्यांच्या प्रचलित अर्थाने वापरलेले असतात. त्यांच्या रचना सुद्धा व्याकरणाच्या नेहमीच्या नियमांवरच आधारलेल्या असतात - म्हणजे त्यांच्या काही वेगळ्या रचना करणे हा पर्याय तिथे रद्दबातल ठरतो. अशा वेळेला निर्माण होणारी संदिग्धता वाक्यरचनेमुळे किंवा शब्दार्थाच्या यदृच्छतेमुळे निर्माण झालेली आहे, असे म्हणता येत नाही. उदा.,

(११) (अ) That man is my mother.

(ब) That women is my father.

यांसारखी वाक्ये घेतली, तर खऱ्या अर्थाने man आणि woman, father आणि mother हे शब्द त्यांच्या त्यांच्या प्रचलित अर्थानेच वापरलेले असतात. त्यामुळेच वाक्यातील चमत्कृतीचा जन्म होतो. त्यामध्ये सर्वसाधारणपणे स्वव्याघाती अभिव्यक्तीचा भास होतो. पण अशा वेळी ते वाक्य खरेच स्वव्याघातती आहे, की नाही, असा प्रश्न निर्माण होतो. परंतु मग ते स्वव्याघाती आहे किंवा नाही, हे दाखविण्यासाठी वाक्याचा अर्थ, वाक्यातील शब्दांचे अर्थ, त्यांचे स्वरूप, त्यांचे प्रकार, ते ठरविण्याचे निकष वगैरे सर्वच

विषयांच्या चर्चेनंतरच एखादे वाक्य स्वव्याघाती होते, असते, म्हणजे काय, ते कोणत्या कारणामुळे स्वव्याघाती होते, अशी स्वव्याघाताची कारणे जीवनात प्रत्यक्षात आढळतात, की नाही वगैरेंसारख्या विषयांसंबंधी काही बोलता येईल.

मुळात शब्दांच्या अर्थांची गोळाबेरीज करून वाक्यांचा अर्थ ठरविता येतो, हे सामान्य माणूसही (कारणे माहीत नसूनही) मान्य करत नाही आणि भाषावैज्ञानिक (कारणे माहीत असल्याने) मान्य करत नाही. रायगड, शिवाजी, कॉरोनेटेड वगैरे शब्दांचे सर्व अर्थ सर्वमान्य आहेत, असे गृहीत धरूनही (१२अ) आणि (१२ब) या वाक्यांच्या अर्थांत फरक आहे, हे लगेच समजते- .

(१२) (अ) Shivaji was coronated on Raigad. मथितार्थ - राज्याभिषेक होणारी व्यक्ती शिवाजी आहे. (रायगडावर)

*(ब) - Raigad was coronated on Shivaji.

मथितार्थ - राज्याभिषेक होणारी व्यक्ती (?) रायगड (शिवाजीवरं?) या चमत्कृतीच्या कारणात रायगड आणि शिवाजी यांच्या शब्दकोशदत्त अर्थांबरोबरच त्यांच्या व्याकरणीय अर्थांचा समावेश होतो. हे व्याकरणीय अर्थ आणि शब्दांचे शाब्द अर्थ (lexical meanings) यांच्यातील परस्परसंक्रियेने वाक्यांचे अर्थ तयार होतात, ही भाषावैज्ञनिक प्रक्रिया आहे.

शब्दांचे अर्थ ठरविण्याच्याही काही प्रक्रिया आहेत. प्रख्यात इंग्रज तत्त्वज्ञ बार्कली यांच्या विचारांची चर्चा[१०] करताना पदार्थ म्हणजे 'अनेक (किंवा शक्यतः अनंत) गुणधर्मांचा समुच्चय' अशा स्वरूपाचा विचार मी मांडला होता. भाषाविज्ञानातही शब्दांचे अर्थ ठरविताना अशा अनेक गुणधर्मांचा विचार केला जातो. उदा., 'माणूस' या शब्दाचा अर्थ पाहताना मनुष्य हा मूर्त, सजीव, मानव, पुंलिंगी वगैरे गुधर्मांचा संघात अभिप्रेत होतो. तो मांडताना[१०] + concrete, + animate, + human, + male वगैरे, वगैरे, अशा एका पद्धतीचा वापर केला जातो. या पद्धतीला Componential Analysis असे म्हणतात.

आता man आणि mother या शब्दांचे अर्थ व्यक्त करताना + human, + male आणि + human, - male असे गुणधर्म सांगावे लागतील. त्यात + male आणि - male हे गुणधर्म परस्परविरोधी असल्याने man आणि mother हे परस्पर छेदक मानावे, त्यामुळे (११अ) किंवा (११ब) सुद्धा - स्वव्याघाती होईल, अशा स्वरूपाचा युक्तिवाद करता येईल. ± male हे व्यक्तीचे व्यवच्छेदक लक्षण मानता येऊ शकते, हे निर्विवाद आहे.

पण ± male हे व्यवच्छेदक लक्षण आहे, याचा अर्थ + male आणि - male हे परस्परविरोधी/ परस्पर छेदक गुणधर्म आहेतच, असे मात्र म्हणणे अवघड आहे. अशा कोणत्या शरीरशास्त्रीय, समाजशास्त्रीय, वस्तुतत्त्वशास्त्रीय (ontological) कसोट्या आहेत, की ज्यांच्या निकषांवर + male आणि - male परस्परछेदक ठरू शकतात? किंबहुना, हे लक्षात घ्यायला हवे, की छेदकत्वाचा भाव व्यक्त करण्यासाठी भाषा काही





अनुक्रमणिका

चिन्हांचा वापर करीतच असते. जसे शुद्ध-अशुद्ध, soluble-insoluble, possible-impossible वगैरे वगैरे; male च्या व्याघाती रचनेसाठी in male, immale यांसारख्या रचना करणे भाषेला अवघड नाही. तशी रचना कुठे आढळत नाही, तेव्हा त्यात विरोध मानणे अवघड आहे. मग ± male यांसारख्या संकल्पना वापरातच कशा आल्या, असाही प्रश्न विचारता येईल

मुळात स्वव्याघाताचा अर्थ 'स्वतःचा नाश करणे' असा केला, तर गणितात +१० आणि -१० यांची बेरीज शून्य होते, म्हणून ते स्वव्याघाती युग्म आहे, असे म्हणता येईल (त्यातही शून्यत्व पावणे म्हणजे नाश पावणे असा अर्थ गृहीत धरावा लागेल.) गणित, तर्कशास्त्र वगैरेंमध्ये आढळणारी ही तर्कशुद्धता सुद्धा वस्तुस्थितीचा विपर्यास करून मांडलेल्या संकल्पनांच्या खेळाच्या डोलाऱ्यावर उभी आहे. त्यात प्रथम शून्याला संदर्भबिंदूचे रूप देऊन त्याच्या अलीकडे आणि पलीकडे दहा दहा अंक घेऊन त्यांना अधिक, उणे अशी चिन्हे देऊन, ते परस्परविरोधी आहेत, अशी त्यांची 'व्याख्या' केलेली आहे आणि त्यांच्या विरोधित्वाचा पुरावा म्हणजे त्यांची बेरीज शून्य होते, हेही व्याख्यातःच ठरविलेले आहे. अशा प्रकारच्या सोयिस्कर व्याख्या, चिन्हे, संक्रिया वगैरे गोष्टी गणित, तर्कशास्त्र यांच्याबाहेर सत्य जगात उपलब्ध होत नाहीत. आपल्याला सोयिस्कर अशा व्याख्या करण्याचे स्वातंत्र्य सर्वांनाच आहे. पण त्या ज्या विषयाच्या मर्यादेत बांधलेल्या आहेत, त्याच्या पलीकडे जाऊन इतरत्रही त्यांना प्रमाण मानले जावे, असे म्हणण्याचे स्वातंत्र्य कोणालाही नाही. त्यामुळे भाषावैज्ञानिकांनी ± male या विशेष्याने काही स्वव्याघाती मांडलेले असल्यास, त्याच्या व्याप्तीच्या मर्यादा आधी स्पष्ट करायला हव्या; आणि त्या व्याघाताचे स्वरूपही स्पष्ट करायला हवे. अन्यथा अमुक एक वाक्य निरर्थक (शून्यार्थक?) होते. तमुक नाही, असे म्हणणे तर्कशुद्ध होणार नाही.

पण विरोध या विषयाच्या संदर्भात एकदा व्याख्या, परिभाषा वगैरेंचा विचार सुरू झाला, की मग त्यात संदर्भबिंदू स्थापन करणे, व्याख्येतील key terms चे (त्यांना कुंजिका शब्द म्हणावे का?) त्या संदर्भबिंदूपासूनचे समान अंतर मोजायला हवे, त्या एकमेकांच्या पूर्ण विरुद्ध दिशेला असायला हव्या; अन्यथा त्यांचा अंतर्गत विरोध स्पष्ट होणार नाही. आणि या अटींचा वरवर विचार करूनही असे स्पष्ट दिसते, की त्यांतील जवळ जवळ सर्वत्र शब्द संदिग्ध आहेत. ज्याच्या उदा., key terms म्हणजे नेमके कोणते शब्द असतात? आता (११ब) मध्ये man आणि mother हे key terms चे कार्य करतात, असे म्हणता येईल, पण प्रत्येक वाक्य इतके सोपे नसते. पुढील उदाहरण पाहा.

(१३) Colourless green ideas sleep furiously.

यातील colourless आणि green यांचे एक युग्म उद्देश्यात आहे, तर sleep आणि furiously यांचे एक युग्म विधेयात आहे. पण हेही फारसे त्रासदायक नाही, असे म्हणता येईल, कारण ideas आणि sleep असेही एक युग्म कल्पिता येते. Colourless green यांच्याऐवजी colourlessly green असे म्हटले, तर त्यांचा संबंध जास्त स्पष्ट होतो किंवा

कसे, हाही वादाचा मुद्दा आहे. मग या वाक्यातील Key terms कोणत्या? Colourless green, की green ideas, की ideas sleep, की sleep furiously, की colourless green ideas आणि sleep furiously?

संदर्भबिंदूची स्थापना तरी कोण करते? भाषक, की निसर्ग? निसर्गाने केली, तर असे वाद निर्माण होणारच नाहीत, म्हणा. पण वाक्य (१३) वरून स्पष्ट दिसते, की संदर्भबिंदू कुठेही मानला, तरी वादाखेरीज काहीच निष्पन्न होणार नाही. हे सर्व बिंदू भाषकस्थापित असल्यामुळे ते यदृच्छ आहेत, हे मान्य करायला हवे. परंतु मग त्यांनी दर्शविलेला व्याघातही यदृच्छतेच्या पायावर उभा राहील. त्याला नैसर्गिक वस्तुस्थितीत स्थान नाही.

संदर्भबिंदूपासूनचे समान अंतर आणि विरुद्ध दिशा यातरी यदृच्छतेखेरीज अन्य कशाच्या पायावर उभ्या राहू शकतील? जिथे केवळ संकल्पनांच्या परस्परसंबंधांचाच विचार करायचा आहे, अशा विषयांमध्ये ही यदृच्छता ठीक आहे. कारण ती अमूर्त आणि अपूर्ण शास्त्रे आहेत, असे म्हणता येते. पण अमूर्त आणि अपूर्णाच्या मर्यादा ओलांडून, आपण सत्यात प्रवेश करायचा प्रयत्न केला, की एक तर त्या पारिभाषिक संज्ञा वापरणे बंद करायला हवे किंवा त्या वापरायच्याच असतील, तर त्या नव्या अर्थाने define करायला हव्या. त्या व्याख्याही अमूर्त आणि अपूर्ण असतील, हे मान्य, पण ही अपूर्णता सत्याच्या आंशिक आकलनासाठीच अंशतःच व्याख्यात केलेली असल्यामुळे ती व्यवस्थित उपपन्न होते. त्यामध्ये प्रत्येकाच्या पूर्वज्ञानाच्या पार्श्वभूमीवर त्याला नव्या ज्ञानाचे आकलन होईल. ते त्याच्या क्षमतेच्या प्रमाणावर अवलंबून राहील, केवळ सांकल्पनीय गोंधळामुळे अमुक एखादे वाक्य कळत नाही, अशी परिस्थिती तिथे निर्माण होणार नाही.

आपला विषय, त्याचे स्वरूप, त्यांच्या मर्यादा या एकदा लक्षात घेतल्या, की त्यांतील विधाने एक तर आकलनाच्या आवाक्यातील असतील किंवा आवाक्याच्या बाहेर असतील, पण ती संदिग्धतेने गोंधळात टाकणारी नसतील. अर्थात ही परिस्थितीसुद्धा आदर्शवतच मानायला हवी. कारण मानवी ज्ञान हे केवळ बुद्धीचा आवाका आणि विषयाची क्लिष्टता यांवरच अवलंबून नसते, त्यात सामाजिक, परस्परसांबंधिक नात्यांचाही बराच मोठा वाटा असतो. अ ला एक विषय समजतो आणि तो ब बरोबर त्यातील संकल्पनांची चर्चा करू शकतो, याचे प्रमुख कारण त्या दोघांनाही निःसंदिग्ध वाटणाऱ्या रचनांवर त्यांचा भाषाव्यवहार उभा असतो- तशी त्यांची निदान समजूत असते. हाही अनुभव अनेक वेळा येतो, की अ ने ब ला एक विषय समजावून सांगितला, तर तो त्याला समजेल किंवा समजणार नाही, समजा, तो विषय ब ला समजलेला नाही. अशा वेळी क ने तोच विषय अतिशय वाईट पद्धतीने (अ च्या दृष्टीने अ पेक्षा जास्त वाईट पद्धतीने) ब ला समजावून सांगितला, तरी तो ब ला समजू शकतो- निदान बऱ्याच वेळा ब तसे सांगू तरी शकतो. आपल्याला काय संदिग्ध वाटावे आणि काय वाटू नये, संदिग्धतेची निःसंदिग्धीकरणही कसे झाले, म्हणजे आपल्याला ते निःसंदिग्ध वाटेल, याचे निर्णय बहुधा त्या भाषकांनीच घ्यायचे असतात,

असे दिसते.

याचा अर्थ असा नव्हे, की Componential analysis मध्ये केवळ समाज/व्यक्तिसापेक्ष अशाच गुणधर्मांची सारणी मांडलेली असते आणि ती सत्यविचारात उपयोगी पडत नाही. अगदी सर्वच गुणधर्मांच्या समाज/भाषक सापेक्षतेला मान्यता दिली, तरी त्यामुळेच कोणत्या धर्मांना परस्परविरुद्ध मानायचे, याचाही निर्णय (सुदैवाने) तितकाच भाषकसापेक्ष असतो, मग एकदा ± male परस्परविरोधी नाही, असे गृहीत धरून, तो गौण मानून, त्याच सारणीतील इतर धर्मांच्या प्राधान्यामुळे (उदा., Affectionate, + caring इ. इ.) mother हा शब्द +male इथेही उपपन्न होईल, असे म्हणता येते. म्हणजे आईसारखे प्रेम करणारा, काळजी घेणारा, (स्वैपाक करू शकणारा) पुरुष, किंवा पुरुषासारखे वर्तन करणारी स्त्री या दोघांनाही That man is my mother या वाक्याने निर्देशित करता येईल. अशा वेळी भाषेच्या एकूण व्यवस्थेत असे काही नाही, की ज्यामुळे या वाक्यातील संदिग्धतेचा निर्णय करता येईल. या निर्णयासाठी त्या दोन शब्दांतील कोणते गुणधर्म गौण आणि कोणते प्रधान ठरवायचे, हे समजण्यासाठी त्या व्यक्तीची भाषातिरिक्त (non-linguistic) माहिती होणे आवश्यक आहे. म्हणजे man मधील + male असेल, तर mother मधील + Affectionate, + Caring प्रधान ठरतील. तेच mother मधील - male प्रधान असेल, तर man मधील + Aggressive, + loud voiced इ. प्रधान ठरतील.

आता man मधील + male आणि Mother मधील - male यांच्यांतील प्रधान/गौणत्व ठरविण्याची एकच पद्धत आपल्याला माहीत आहे. ती म्हणजे, त्या शब्दांनी निर्देशित होणाऱ्या व्यक्तींची भाषातिरिक्त माहिती. त्या शब्दानी ज्यांचा निर्देश होतो, त्या व्यक्ती (म्हणजे त्यांचे referents) स्त्री आहेत, की पुरुष, ही जीवशास्त्रीय माहिती मिळणे आवश्यक आहे. त्याचबरोबर त्या वाक्यामागचा सामाजिक, सांस्कृतिक, वैचारिक संदर्भही ज्ञात होणे आवश्यक आहे. वाक्य क्र. (१३) वरून स्पष्ट दिसते, की कशाला परस्परव्याघाती युग्म ठरवायचे, हे पूर्णपणे भाषेच्या व्यवस्थेच्या बाहेर सापडणाऱ्या पुराव्यांनीच ठरवावे लागेल. कदाचित असाही समाज सापडू शकेल, की ज्यात हे वाक्य स्वव्याघातीच नाही. अशा प्रकारची संदिग्धता ही semantic किंवा pragmatic स्वरूपाची आहे, असे म्हणावे लागेल. ती समाजसापेक्ष असते. त्या अर्थाने ही संदिग्धता पूर्णपणे संदर्भ/प्रकरणसापेक्ष आहे, असे म्हणावे.

(एकदा भाषाबाह्य संदर्भाच्या साहाय्याने निःसंदिग्धीकरणाची प्रक्रिया करायची म्हटले, तर भाषावैज्ञानिकाचे कामच संपले. निःसंदिग्धीकरणाचे संदर्भ जोपर्यंत भाषाविज्ञानाच्या नियमांमध्ये बद्ध आहेत, तोवरच त्यांना एक सुसूत्रता आणि निश्चितपणा येतो. आता तर्क आणि गणित यांच्याप्रमाणे भाषाविज्ञानाचे क्षेत्रही अपूर्ण आणि अमूर्त आहे, हा आक्षेप स्वीकारायला काही हरकत नाही. पण एकदा या अपूर्णतेच्या आणि





अनुक्रमणिका

अमूर्ततेच्या चौकटीत -याला इंग्रजीत perspective असे म्हणता येईल- उपलब्ध अनुभूती मांडायचे ठरविले, की मग त्यातील निःसंदिग्धता ही पूर्ण सुघड आणि पूर्ण सत्य (very solid and very real) अशा स्वरूपाची असते. या चौकटीचे नियम शोधणे, त्यांचा पाठपुरावा करणे, त्यांना औपपत्तिक स्वरूप देणे यात भाषावैज्ञानिकाला रस असणे स्वाभाविक म्हणावे लागेल. एकदा संदर्भाचे धागेदोरे त्या चोकटीच्या बाहेर गेले, की ते तत्त्वज्ञान, विज्ञान, राज्यशास्त्र किंवा अन्य कोणत्याही विषयाच्या क्षेत्रात जाऊ शकतील. त्यासंबंधी बोलण्यात त्याला रस असण्याचेही कारण नाही आणि त्याला तो अधिकारही नव्हे. तेव्हा अशा वेळी त्याने आपल्या विषयाच्या मर्यादा स्पष्ट करून तिथेच चर्चा थांबविलेली बरी)

**(४) वाक्यरचनासापेक्ष किंवा निम्नस्तरीय संदिग्धता.**

वाक्याच्या विविध एककांमध्ये त्याचे विश्लेषण करीत असताना वरवर भासमान होणाऱ्या अर्थापेक्षा वेगळा अर्थ जेव्हा समोर येऊ लागतो, तेव्हा त्याच्या पृष्टतलीय रचनेव्यतिरिक्त अर्थाची दुसरी एक निम्नस्तरीय[११] योजना (कळत/नकळत) तयार झालेली आहे, असे दिसते. अनेक वेळा अशा निम्नस्तरीय अर्थांचा पत्ता केवळ संदिग्धतेमुळे लागतो. अशा वेळी एकच पृष्ठतलीय शब्दरचना आढळते, पण केवळ निम्नस्तरीय अर्थनिर्देशात फरक असल्याने त्यांचे भिन्न भिन्न अर्थ समोर येतात, असे दिसते. उदा.,

(१४) (अ) Flying planes can be dangerous.

(ब) Visiting relatives can be a nuisance.

अशी विधाने करताना Flying planes आणि Visiting relatives या नामबंधांचे दोन दोन अर्थ उपलब्ध होतात.

Flying planes = planes that fly

= the activity of flying planes.

किंवा visiting relatives = relatives, who visit

= the activity of going to visit relatives.

त्यामुळे 'उडणारी विमाने,' 'भेटणारे नातेवाईक' हे धोकादायक/त्रासदायक असू शकतात, की विमाने उडविण्याची / नातेवाइकांना भेटण्याची' क्रिया* ही धोकादायक/त्रासदायक असू शकते, ते कळत नाही. व्याकरणाच्या भाषेत बोलायचे, तर Flying / visiting ही एकदा नामाप्रमाणे, तर दुसऱ्या जागी विशेषणाप्रमाणे कार्य करताना आढळतात. रूपांतरणवादी व्याकरणामध्ये त्यांचे स्वरूप वृक्षचित्रात (किंवा वृक्षालेखात) दाखविण्याची पद्धत आहे. ती अनेक वेळा उपयुक्त ठरते. इथेही Flying planes आणि visiting relatives वृक्षालेख दाखविताना प्रत्येकाची दोन वेगवेगळी स्वरूपे दाखविता येतील. ती अशी :

15) 





Visiting relatives या नामबंधाचे ही याचप्रमाणे विशेषण- नाम, नाम-नाम असे वृक्षालेखित स्वरूप दाखवता येईल.

Flying planes ही रचना विशेषण+नाम या स्वरूपाची मानली, तर planes हा शब्द वाक्यात कर्ता आहे, असे म्हणावे लागते. त्यामागच्या पूर्वकल्पना (Suppositions)

(१६) (अ) Planes fly (They can fall, kill passengers) अशा गृहीत मानून

(ब) Such planes i.e. flying planes can be... असा निष्कर्ष मांडावा लागतो.

याउलट, Flying planes ची रचना क्रियापदात्मक (gerundival) नाम + कर्मस्वरूप नाम (objectival noun) अशी मानली, तर कोणी तरी - म्हणजे आपण स्वतःच - विमाने उडवीत आहोत, असा अर्थ गृहीत मानावा लागतो आणि ही क्रिया आपल्याला धोकादायक आहे, असा निष्कर्ष काढता येतो. त्या वेळी वाक्यातील कर्ता planes न राहता flying हा शब्द होतो. त्याचा अर्थ लावताना

(१७) (अ) Someone flies planes (he can get hurt)

म्हणून (ब) Flying planes can be dangerous

(for the flier not for non - fliers)

या प्रकारच्या रचना कराव्या लागतात.

त्यातील प्रश्न असा, की विशेषण+नाम किंवा नाम+नाम अशा दोन भिन्न निम्नस्तरीय रचना व्यक्त करायच्या असताना, शब्दस्तरीय रचना मात्र एकच आहे, असे का आढळते?

इंग्रजीतील-ing हा प्रत्यय तीन विविध रूपिमांची कार्ये करताना आढळतो, हे सर्वांनाच माहीत आहे. त्यांतील एक म्हणजे, पदाने व्यक्त होणाऱ्या क्रियेची अपूर्णता दाखविणे, उदा., going 'जात'. ज्याला progressive aspect marker म्हणजे क्रिया चालूच आहे, हे दर्शविणारा प्रत्यय; दुसरे म्हणजे विशेषण, उदा. running man 'धावणारा मनुष्य; आणि तिसरे म्हणजे, क्रियात्मकताधारित नाम, उदा., running 'धावणे' किंवा running a store 'दुकान चालविणे'. यातील तिसरा वर्ग जरा जास्त लक्ष वेधून घेतो, कारण क्रियापदांत सकर्मक आणि अकर्मक क्रियापदे असे दोन प्रकार आहेत. त्यांतील अकर्मक क्रियापदांची होणारी नामे, जशी sleeping, going, sitting वगैरेंच्या

रचनेत फार लक्ष द्यावे लागत नाही; पण सकर्मक क्रियापदे मात्र दुविधेत टाकतात. कारण एकीकडे अकर्मक क्रियापदांप्रमाणे त्यांच्या नामांनंतर दुसरी नामे (काही वेळा) न वापरली, तरी चालते. उदा., writing, eating, reading त्यामुळे

(१८) Writing / reading can be a pleasant activity. अशी वाक्ये व्याकरणशुद्ध असतातच. मात्र अनेक वेळा ती आपला मूळचा सकर्मक स्वभाव न विसरल्यामुळे त्यांच्याबरोबर योग्य ती कर्मनामे पण घेऊन येतात. उदा.,

(१९) (अ) Reading news - papers is a waste of time.

(ब) Running a big departmental store is...

या दोन्ही प्रकारच्या नामांना क्रियापदकार्यकारी नामे असे म्हणावे. तेव्हा progressive aspect marker, विशेषण कार्यकारी, आणि क्रियापद कार्यकारी नाम या तिन्ही प्रकारच्या रूपिमांसाठी -ing हा प्रत्यय वापरता येतो.

या संदिग्धतेचा विचार करताना तीन ठळक मुद्दे समोर येतात. एक म्हणजे क्रियापदकार्यकारी नामानंतर दुसरे कर्मकार्यकारी नाम येणे अतिशय आवश्यक आहे. या प्रकारातील वाक्यांमध्येच संदिग्धता निर्माण होते असे दिसते. याचे सोपे कारण म्हणजे (१७अ) आणि (१७ब) या वाक्यांतील दोन भिन्न अर्थांच्या निष्पत्तीसाठी दोन भिन्न कर्त्यांची आवश्यकता आहे, वाक्यात एकच कर्ता उपलब्ध असेल, तर ते शक्य नाही.

दुसरे म्हणजे (१७अ), (१७ब) यांतील क्रियापद हेही modal सारखेच[१२] क्रियापद असावे लागते. म्हणजे can ऐवजी त्यात may सारखी रूपे वापरूनही संदिग्धता निर्माण होईल. पण तेच is, was सारखी क्रियापदे वापरली, तर संदिग्धता लगेच नष्ट होते.

पाहा (२०) (अ) Flying planes can / may / must / be dangerous.

पण (ब) Flying planes is dangerous.

किंवा (क) Flying planes are dangerous.

(२०अ) हे कोणत्याही पर्यायात संदिग्धच राहते. मात्र (२०ब) आणि (२०क) ही संदिग्ध असणे अशक्य आहे. कारण (२० ब) मध्ये Flying हा कर्ता आहे, तर (२०क) मध्ये planes हा कर्ता हे सर्वांनाच समजते. याचा अर्थ असा Flying planes या नामपदबंधामुळे ज्याप्रमाणे संदिग्धता निर्माण होते, त्याप्रमाणेच इंग्रजीतील modal क्रियापदांच्या वापरानेही ती निर्माण होते. कारण modal क्रियापदे एकवचनी, अनेकवचनी नामांसाठी भिन्न रूपे वापरत नाहीत, be, have ही क्रियापदे मात्र एकवचनासाठी am, is, was, has तर अनेकवचनासाठी are, were, have वगैरे रूपे वापरताना आढळतात. याच युक्तिवादाचा थोडा भाग तिसऱ्याही युक्तिवादात आढळेल, तो असा, की याप्रमाणे क्रियापदांची रूपे वापरणे हा त्या भाषाविशेषाच्या व्यवस्थेचा भाग आहे. उदा., इंग्रजीत modals मुळे संदिग्धता येते, हे खरे, पण ज्या भाषांत modals ची एकवचनी, अनेक वचनी वगैरे रूपे आढळतात, तिथे असे होणार नाही. उदा., इंग्रजीच्याच संस्कृत, फ्रेंच, मराठी सारख्या बहिणी can या क्रियापदाचीच अनेक रूपे दाखवितात उदा., संस्कृतमध्ये

शक्नोति, शक्नुवन्ति तर फ्रेंच मध्ये peut, pouvent ही रूपे आढळतात. मराठीत तर कर्त्याच्या वचनाप्रमाणे, पुरुष आणि लिंग यांच्याप्रमाणेही रूपे बदलताना आढळतात उदा., शकतो, शकते, शकतात[१३] अशी रूपे इंग्रजीत असती, तर संदिग्धतेचे सहज निर्मूलन झाले असते.

याच विषयातील तिसरा मुद्दा असा, की क्रियेची अपूर्णता, विशेषण, नाम यांतील भिन्न कल्पनांसाठी इंग्रजी एकच प्रत्यय वापरते, हेही आश्चर्यकारक आहे. इंग्रजीच्याच इंडोयुरोपियन भाषांच्या कुळातील संस्कृत, फ्रेंच, मराठीसारख्या भाषा त्यासाठी वेगळे प्रत्यय वापरतात, असे आढळते; आणि महत्त्वाचे म्हणजे, त्या एकाच भाषाकुळातील असल्यामुळे त्यांनी वापरलेले प्रत्ययही एकाच स्वरूपाचे आहेत, असेही म्हणता येते. उदा.,

| | सं. | म. | फ्रें |
|---|---|---|---|
| धावतो | | | |
| अपूर्णतेसाठी | धावति | धावत | peut, sourit |
| विशेषणासाठी | धावन्त | धावणारा | courant, souriant |
| तर नामासाठी | पतन, स्मरण | स्मरण, धावणे | civilization |

यांसारखी रूपे आढळतात, त्यांत अधोरेखित केल्याप्रमाणे मराठी, संस्कृत, फ्रेंच या सर्वच भाषा क्रियेच्या अपूर्णतेसाठी-अत्, विशेषणासाठी - अन्त / अन्; तर नामासाठी अन / on यांसाररखे ध्वनी असणारे प्रत्यय वापरताना आढळतात.

या तुलनेतील एक ठळकपणे सामोरी येणारी गोष्ट म्हणजे अत्, अन्, on वगैरे प्रत्ययाचे इंग्रजीतील ing या प्रत्ययाशी विलक्षण साम्य आहे. इंग्रजीतही examination, civilization वगैरे नामांमध्ये अन हे ध्वनी सापडतातच, असे कोणी म्हणू शकेल, पण, आणि हा पण अतिशय महत्त्वाचा आहे, on ने जी नामे इंग्रजीत तयार झालेली आढळतात, ती बहुतेक सगळी मूळ फ्रेंचमधून आलेली आहेत.[१४]

आता प्रश्न असा, की तर्कशास्त्रदृष्ट्या तीन संकल्पनांसाठी तीन भिन्न प्रत्यय वापरले जाणे अपेक्षित आहे आणि प्रत्यक्षातही इंग्रजीच्या तीन भाषाभगिनींमध्ये तशी रूपे आढळतातच. अशा परिस्थितीत इंग्रजी मात्र त्या तीन प्रत्ययांशी विलक्षण साम्य दाखविणारा (पण प्रत्यक्षात एकच असणारा) प्रत्यय का वापरते?

वरील प्रश्नाला एक ऐतिहासिक आणि दुसरे अनैतिहासिक उत्तर देता येऊ शकेल. एक म्हणजे या रचनांनी संदिग्धता येते, हे इंग्रजी भाषकांनासुद्धा माहीत आहेच. त्यामुळे त्यांनी पर्यायी शब्दरचनांची व्यवस्था केलेलीच असते. Flying planes can be dangerous ही अनवधानाने, अनपेक्षितपणे, अनिच्छितपणे तयार झालेली रचना आहे.[१५] प्रत्यक्षात Flying planes ही विशेषण + नाम किंवा नाम + नाम अशी रचना होते, हे सर्वांना माहीत आहे. विशेषण + नाम जी इंग्रजीत जास्त प्रवरणीय रचना आहे, तीत स्वाभाविकच नामाप्रमाणे क्रियापदाचे रूप बदलले, ही नैसर्गिक प्रवृत्तीही आढळून येते. त्यामुळे संदिग्धता निर्माण होतच नाही. किंवा क्रियापदकर्मकारी नाम वापरायचे असेल, तर





अनुक्रमणिका

त्याला असणारे पर्याय उदा., running साठी to run, swimmig साठी, swim हे वापरणे, किंवा running, swimming वगैरे वापरलेच, तर modal क्रियापदे न वापरता be, have सारखी क्रियापदे वापरणे ही नैसर्गिक प्रवृत्ती आहे. त्यामुळेही संदिग्धता निर्मूल होते.

आता ऐतिहासिक दृष्टीने पाहिले, तर दोन विचार करणे आवश्यक वाटते. एक म्हणजे, इतर भाषाभगिनींमध्ये अत्, अन्त, अन् हे प्रत्यय दिसत असताना आणि विशेषतः इंग्रजीतही -ing हा प्रत्यय प्रत्यक्षच वापरला जात असताना- इंग्रजीत असे तीन वेगवेगळे प्रत्यय नव्हते, असे म्हणणे धाष्ट्यर्चि आहे. आता एक शक्यता अशी आहे, की on ने दर्शविली जाणारी नामे ही फ्रेंचमधून Latinised स्वरूपात आलेली असल्याने मूळ अँग्लो सॅक्सन शब्दांच्यावर त्यांचे आक्रमण होणे स्वाभाविक आहे.- on ने निर्देशित होणारी नामे त्यांच्या 'शुद्ध' स्वरूपात वापरणे हे कदाचित प्रतिष्ठेचे लक्षण असावे. पण त्याची प्रतिक्रियाही कुठे कुठे व्यक्त होत असावी, त्यात 'देशी' शब्दांसाठी कोणते प्रत्यय वापरावे, हा सुद्धा त्यातील एक प्रश्न असावा. माझे हे चिंतन सर्वार्थांनीच विचारीय (Speculative) या स्वरूपातील आहे, हे खरे; पण ते कदाचित वस्तुस्थितीचेही निदर्शक असू शकेल. पण महत्वाचे हे, की अत् अन्त, अन या प्रत्ययांसारखे असणारे इंग्रजीचे प्रत्यय कधीतरी -ing या एकाच रूपात संश्लिष्ट झाले. त्यानंतर शेकडो वर्षे क्रियेची अपूर्णता नाम, विशेषण ही सारी त्या प्रत्ययाने दर्शविली जात आहेत; पण त्या भिन्न प्रत्ययांची यादगार आजही त्या भाषेच्या व्यवस्थेत उपलब्ध आहे. या व्यवस्थेला Ferdinand de Saussure यांच्या परिभाषेत langue असे म्हणतात. चॉम्स्की यांच्या परिभाषेतील Competence च्या संकल्पनेत ते मिळत नाहीत.

या प्रकारची संदिग्धता जेव्हा निर्माण होते, तेव्हा ती वाक्यातील शब्दांची रचना, त्यांचे संदर्भ, त्यांचे उच्चार वगैरेंसारख्या निकषांवर निःसंदिग्ध करता येत नाही. त्यासाठी त्याची निम्नस्तरीय अर्थयोजनाच वापरावी लागते. म्हणजे त्यासाठी

(२१) अ) To visit relatives can be dangerous.

ब) Visiting relatives is/are dangerous.

किंवा क) Relatives who visit...

ड) The activity of visiting one's relatives...

यांसारख्याच रचना वापराव्या लागतात.

पण To visit = visiting कारण त्यांतील एक नाम आहे, तर दुसरे (२१ ब मध्ये) विशेषण आहे. तसेच is, are = can be आणि Relatives who visit = The activity of visiting relatives असे स्पष्ट आहे. त्या वाक्यांची प्रकरणे वेगळी आहेत. आपल्या मूळ निकषानुसार वाक्याच्या प्रकरणाच्या बाहेर जाऊन निःसंदिग्धीकरण करणे आवश्यक असेल, तर त्याला खऱ्या अर्थाने निःसंदिग्धीकरण म्हणू नये, असे आहे. खऱ्या अर्थाने हे प्रकरणाबाहेर जाऊन केलेले निःसंदिग्धीकरण नाही, असे म्हणता येईल, कारण

त्यातील निम्नस्तरीय अर्थविन्यास एकच आहे. परंतु हे चक्रीय युक्तिवादात येते. दोन वाक्यांतील निम्नस्तरीय अर्थविन्यास एकच आहे, म्हणून संदिग्धता निर्मूल होते, हे ठीक; पण तो अर्थविन्यास एकच आहे, हे कशावरून ठरविणार? त्याचे उत्तर competence मध्ये नव्हे, तर Langue मध्ये सापडते. तसे नसले, तर अर्थविन्यास एकच आहे, असे म्हणणे शक्य नाही.

आता दुसरा युक्तिवाद असा. प्रकरण हा निकषच मानू नये. पण मग निःसंदिग्धीकरण पूर्ण होत, नाही. Can be आणि is/are यांचे अर्थ वेगळे आहेतच. एकाने दुसऱ्याचे निःसंदिग्धीकरण होते असे मानणे अवघड आहे.

आपण कोणते निकष वापरावे, हा आपल्या निवडीचा भाग आहे. प्रश्न एवढाच आहे, की प्रत्येक निकषानुसार त्यानुसार येणाऱ्या निष्कर्षांना मर्यादा पडत जातात. त्या मर्यादांचे पालन करणे हे आपले कर्तव्य असते. can be आणि is/are यांच्यांत फरक आहे, की नाही, हे ठरविणे आपल्या निवडीचे क्षेत्र; पण तसे मानणे एकदा त्याच्या निष्कर्षाच्या मर्यादांपर्यंत नेले, की मग Flying planes can be dangerous हे संदिग्ध राहतच नाही. एक तर ते संदिग्ध आहे, असे मानायला हवे किंवा ते संदिग्ध नाही, असे मानायला हवे. प्रत्यक्षात ते संदिग्ध आहे, हा सर्वांचा अनुभव आहे. अशा परिस्थितीत can be, am, is, are ची सममूल्यता धोक्यात येते. त्यांपैकी एकाचा त्याग करावाच लागेल, कारण दोन्ही सत्य आहेत. असे मानण्याचा हव्यास निरर्थकतेकडे जाईल. म्हणजे या प्रकारची संदिग्धता नष्ट करण्याची क्षमता भाषेमध्ये नाही (किंवा होती, ती भाषेने गमावली) असे म्हणणे हेच जास्त सोयीचे ठरेल.

**भ्रमसापेक्ष संदिग्धता / गृहीततलीय संदिग्धता :**

या प्रकारातील संदिग्धता 'मध्यमवयीन', 'भाजी', 'शहर /गाव' वगैरे शब्दांच्या वापरातून उत्पन्न होणारी संदिग्धता आहे आणि तिच्या संदर्भात एक पूर्ण निबंध[१६] आधीच लिहून झालेला असल्याने आता त्यासंबंधी काही बोलू नये, हे खऱ्या अर्थाने अपेक्षित आहे.

तथापि, इथे नोंदवण्यासारखी महत्त्वाची बाब ही, की 'भाषेची यदृच्छता' या विषयात भाषेचे स्वरूप, भाषेचे कार्य, रचना वगैरे दृष्टिकोनांतून या प्रकारच्या संदिग्धतेची चर्चा झालेली होती. प्रस्तुत विवेचनात संप्रेषणाची उद्दिष्टे, तिच्या कार्यपद्धती आणि तिच्यामागे गृहीत धरली जाणारी, स्वतःसिद्ध मानली जाणारी गृहीते यांचा विचार करायचा आहे.

एखादा मनुष्य मध्यमवयीन आहे, असे म्हटल्याने त्याचे नेमके वय काय, या प्रश्नाचे उत्तर देता येत नाही. त्यादृष्टीने मध्यमवयीन हा शब्द संदिग्ध आहे, असे म्हणता येईल. पण अतिशय महत्त्वाची गोष्ट म्हणजे, ध्वनी, शब्दरचना, वाक्यरचना संदर्भ यांपैकी कोणत्याही घटकाच्या कमतरतेमुळे, दोषास्पदतेमुळे किंवा गैरवापरामुळे ही संदिग्धता उत्पन्न झालेली आहे, असे म्हणणे शक्य नाही. त्यांपैकी कोणत्याही निकषाच्या आधारावर तिचे निःसंदिग्धीकरण करणे शक्य नाही.

आता एखाद्याचा उल्लेख मध्यमवयीन असा केला, तर तिथे संदिग्धता निर्माण होते,

असे म्हणणे ठीक आहे. पण असे काय म्हटले, तर ते संदिग्ध होणार नाही, असे म्हणता येईल? समजा, त्याचे वय अठ्ठेचाळीस वर्षांचे आहे, असे म्हटले, तर ते निःसंदिग्ध होईल का? त्याचे सत्तेचाळिसावे वर्ष कधी संपले आणि एकूणपन्नासावे वर्ष कधी सुरू होईल, हे आपल्याला खरेच ज्ञात असते का? तुमच्या माझ्या घड्याळामध्ये असणारा सूक्ष्म फरक आपण ऐकमत्याने म्हणजेच यदृच्छतेने नष्ट करू, असे आपण ठरवू शकतो. पण ते तरी खऱ्या अर्थाने शक्य आहे का?

बरे सर्व घड्याळे एकच वेळ दाखवितात, असे मानले, तरी वर्षगणनेच्या प्रक्रियेसंबंधी वादास्पदता टाळता येतच नाही. आपण हे सर्व चांद्रमासाप्रमाणे मोजायचे, की सौर मासाप्रमाणे, आपले कॅलेंडर दाते पंचांगाचे आहे, की टिळक पंचांगाचे, त्यातील दिवस ध्रुवीय आहेत, की विषुववृत्तीय (म्हणजे दिवस सहा महिन्यांचा आहे, की चोवीस तासांचा?), दिवस मोजताना रात्री बारापासून दुसऱ्या रात्रीच्या बारा वाजण्यापर्यंतचा दिवस मोजायचा, की एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा दिवस मोजायचा, आणि एका सूर्यास्तापासून दुसऱ्या सूर्यास्तापर्यंत दिवस का नाही मोजायचा), दिवस मोजताना दिवस आणि रात्री एक करून मोजायचे, की दिवस वेगळे आणि रात्री वेगळ्या, असे मोजायचे? या प्रश्नांना उत्तरे देणे माझ्या अल्पमतीला फारच अवघड वाटते, पण हे काहीच नाही.

कालगणना करायचीच, तर ती पृथ्वीसापेक्ष असावी, की चंद्रसापेक्ष असावी? (चंद्राची एकच बाजू सूर्याकडे नेहमी असल्याने चंद्राच्या एका बाजूला कायम दिवस आणि दुसऱ्या बाजूवर कायम रात्र असते. म्हणजे चंद्रावर रात्र-दिवस-रात्र दिवस हे चक्र अस्तित्वातच नाही.) बरे, ही कालगणना पृथ्वीच्या गतीप्रमाणे ठरवायची, की अंतरिक्षयानातील प्रवाशांच्या गतीप्रमाणे ठरवायची? (सापेक्षतावादाप्रमाणे या कालगणनांमध्ये फार फरक पडतो.) त्याहीपेक्षा वाईट म्हणजे, ती पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षण सामर्थ्याप्रमाणे ठरवायची, की एखाद्या कृष्णविवराच्या गुरुत्वसामर्थ्याप्रमाणे ठरवायची? (खगोलशास्त्रीय निष्कर्षांप्रमाणे एखादी वस्तू पृथ्वीकडे ९८० सें.मी. / सें.$^{२}$ या गतीने खेचली जाते आणि सांत कालावधीत तीवर पडते, पण कृष्णविवरांच्या सान्निध्यात काळावरही विलक्षण परिणाम होत असावे. त्यामध्ये पडणारी वस्तू आपल्याला अनंत काळापर्यंत पडताना दिसेल.) बरे या सगळ्या गोष्टींची समाधानकारक उत्तरे मिळतात, असे गृहीत धरले, तरी जिथे पूर्ण पोकळी असलेली असा अवकाश उपलब्ध होतो (म्हणजे, खरे म्हणजे, या विश्वाचा शेकडा नव्वद टक्के किंवा त्याहूनही जास्त भाग म्हणायला हवा- खरे म्हणजे, तो अनंत असल्याने मोजताही येणार नाही), अशा अवकाशात कालगणना कशी करणार?

काळासारख्या मापनीय समजल्या जाणाऱ्या, सर्वज्ञात असणाऱ्या quantity संबंधीसुद्धा एवढी संदिग्धता निर्माण होते, असे म्हणायचे असेल, तर अठ्ठेचाळीस वर्षे इतके वय सांगताना जी संदिग्धता निर्माण होते, तिच्या किती तरी कमी संदिग्धता मध्यमवयीन या शब्दाने निर्माण होते. असे म्हणणे भाग आहे. आणि तसेच विचार करायला गेलो, तर काल





अनुक्रमणिका

आणि अवकाश या दोन्ही वस्तू (?) संबंधात अनेक महान बुद्धिमंतांनी आपली आयुष्ये खर्च करून अनेकविध निश्चित माहिती गोळा करण्याची धडपड केलेली आहे. निदान अशा प्रकारची, इतका वैज्ञानिक, इतका दीर्घकाळ अभ्यास गाव / शहर / महानगर, भाजी / फळे, तापमान वगैरे विषयांचा झालेला नाही. तेव्हा या विषयातील संदिग्धता अमुक एका पद्धतीने नष्ट करता येईल आणि दुसऱ्या एका पद्धतीने करता येणार नाही, असे म्हणणे फारसे उपयुक्त नाही.

पण महत्वाचा भाग असा आहे, की निःसंदिग्धीकरणाची क्रिया ज्या काही ज्ञात निकषांवर करता येते, म्हणजे ध्वनी, शब्द, वाक्यरचना - एकूणच त्याचे प्रकरण - यांपैकी कोणत्याही निकषावर त्याचे निःसंदिग्धीकरण होत नाही. याचे कारण त्या प्रकरणामध्ये निःसंदिग्धीकरणाचे सामर्थ्य नाही, असा नव्हे, तर त्या प्रकरणाचा विचारच न करता भलत्याच प्रकरणाचा विचार केलेला आहे, हे असते.

एखादा मनुष्य मध्यमवयीन आहे (त्याचे वय अठ्ठेचाळीस वर्षे आहे), पाणी कोमट आहे (पाण्याचे तपमान ३८° सेल्सिअस इतके आहे) वगैरे विधाने करणाऱ्या भाषकाने त्या विधानांच्या सिद्धतेसाठी एक गृहीतांचा सट गृहीत धरलेला असतो. त्यामुळे संदिग्धता निर्माण होत नाही, असे आपण म्हणू शकत नाही, पण तिच्या निर्मूलनासाठी त्याच गृहीतांच्या सटाचा वापर करायला हवा. 'पाण्याचे तापमान पंचेचाळीस अंश सेल्सिअस आहे', असे म्हणणाऱ्याने सुद्धा दुसरा एक गृहीतांचा सट गृहीत धरलेलाच असतो. एका विधानाच्या जागी दुसरे विधान प्रस्थापित करताना आपण फक्त एका गृहीताच्या सटाच्या जागी दुसऱ्या काही गृहीतांचा सट स्थापत असतो. अशा वेळी त्यातील प्रवरणीय सट कोणता, हा वादाचा मुद्दा आहे. पण, खरे म्हणजे, अनेक वेळा असेच दिसेल, की प्रथम गृहीत धरलेला सटच जास्त प्रवरणीय होता.

पण मुख्य म्हणजे, गृहीतांच्या सटांची तुलना करणे आणि त्यांची प्रवरणीयता ठरविणे या गोष्टी सहज सुलभ आहेत, असे मानले, तरी केवळ एका गृहीताच्या सटांच्या जागी दुसरा सट स्थापित करून प्रश्न सुटतो, असे नव्हे. कोणताही वाग्व्यवहार निःसंदिग्ध होतो. - म्हणजे भाषकांचे संप्रेषण सहज साध्य असते. याचे मुख्य कारण म्हणजे, त्यांनी एकच किंवा सममूल्य असणारा गृहीतांचा सट ऐकमत्याने मान्य केलेला असतो. त्या सटातील गृहीतांचे स्वरूप, अर्थ (significance) किंवा रचना किंवा आकडा बदलला, तर संदिग्धता निर्माण होणे स्वाभाविक आहे. पण अशा वेळी आहे त्या सटाचीच पुनर्रचना करून ती निर्मूल करायला हवी. म्हणजे दोन वेगळ्या भासणाऱ्या सटातील गृहीते वास्तविक एकरूप आहेत, असे सिद्ध करायला हवे. एखाद्या घरातील खोलीत धूर फार कोंदाटल्यामुळे त्यातून बाहेर पडल्यावर 'त्या खोलीत कार्बन मोनॉक्साईड फार झाला' म्हणून मी बाहेर पडलो' अशा वैज्ञानिक परिभाषेत कोणी सांगू लागला, तर ते फारसे परिणामकारक संप्रेषण होईल, असे वाटत नाही, पण तेच, त्या खोलीत फार कोंदाटल्यासारखे झाले, म्हणून मी बाहेर पडलो' असे सांगणारा संदिग्धतेच्या जंजाळात पडतो, असे होत नाही. वैज्ञानिक दृष्टीने त्या

खोलीतील वस्तुस्थिती एकच आहे. तिचे reporting ही एकच गृहीत धरता येते. केवळ शब्दांच्या खेळामुळे त्यातील गृहीते वेगळी आहेत, असे वाटले, तर संदिग्धता निर्माण होईलच; पण तिचे निराकरण त्या गृहीतांच्या रचनेत बदल करूनच करता येते. त्याजागी दुसरी गृहीते मांडून नव्हे.

गृहीतांच्या एका सटाऐवजी दुसरा सट Substitute करून वाक्प्रयोगातील संदिग्धता निर्मूल करता येते, असे मानणे भाबडेपणाचे आहे. कारण याआधी म्हटल्याप्रमाणे गृहीतांचा सट एक असल्याखेरीज निःसंदिग्धता येत नाही. आता एकाच विषयावर बोलायचे असेल, तर त्यात गृहीतांचे अनेक सट मानता येतील, हेही शक्य नाही. 'मध्यमवयीन' आणि 'अठ्ठेचाळीस वर्षे' या वाक्प्रयोगांनी 'वय सांगणे' हा एकच विषय चर्चेसाठी घेतलेला आहे. त्यांच्यामागे असणाऱ्या गृहीतांच्या स्वरूपात आढळणारा फरक हा फक्त वरवरचा किंवा पृष्ठस्तरीय आहे. निम्नस्तरीय विचार करायचा, तर त्या दोन्ही वाक्प्रयोगांमागची गृहीते तीच आहेत, असे आढळते. अशा वेळी त्यांचा पृष्ठस्तरीय तसाच निम्नस्तरीय विचार करण्याऐवजी फक्त पृष्ठस्तरीय फरकांचा विचार करून आपण एका अवरणीय सटाऐवजी दुसरा एखादा वरणीय सट भाषकांना देतो आहोत, असा आपला समज होतो. वरवर भिन्न वाटणाऱ्या दोन वाक्प्रयोगांनी एकच निम्नस्तरीय गृहीतांचा सट वापरलेला आहे, असे म्हटले, तर ते सामाजिक भाषाविज्ञानाच्या क्षेत्रात जाईल; आणि भाषा ही सामाजिक असते, हे सर्वांनाच मान्य आहे. भाषा संप्रेषणासाठी वापरली जात असल्याने योग्य त्या संदर्भात योग्य ती भाषारचना करून वाग्व्यवहार चालतो. त्यातील एकाची संदिग्धता दुसऱ्याने नष्ट होत नाही. तशी ती करता येते, असे विधान फक्त यदृच्छता / अपूर्णता / अमूर्तता यांसारख्या एखाद्या निकषाच्या आधारावर करावे लागेल.

अपूर्णता आणि अमूर्तता प्रत्यक्षात दोषास्पद आहे, असे म्हणणे अशक्य आहे. माझ्या म्हणण्याचा भाग एवढाच, की इतर वैज्ञानिक त्यांच्या विरोधकांची उत्तरे खोडण्यासाठी त्यांत अपूर्णता आणि अमूर्तता यांचे दोष आहेत, असे म्हणत असतील, तर त्यांचे स्वतःचे विवेचनसुद्धा तितकेच अपूर्ण / अमूर्त / यदृच्छ किंवा एकदम हे सर्वच आहेत, असे दाखविणे माझे काम आहे. काचेच्या घरात राहणाऱ्यांनी आपण कोणत्या घरात राहतो आहोत, हे विसरू नये, एवढीच माझी माफक अपेक्षा आहे.

**टीपा :**

१) गृहीते हा शब्द सर्वांना ज्ञातच आहे. पण विवेचनासाठी एखादे उदाहरण म्हणून म्हणता येईल, की 'पाहा, आकाश निळे आहे' हे विधान करणारा ऐकणाराकडे पाहण्याची क्षमता आहे, हे गृहीत धरतो.

२) कोणत्याही वाग्व्यवहारात ध्वनी, रूपिम, वाक्य, संदर्भ, गृहीते या सगळ्यांचा विचार होतो, हे सर्व मान्य करतील. पण हे घटक स्थिर, अचल, निष्क्रिय आहेत, असे म्हणणे अवघड आहे. 'तो माणूस माझी आई आहे' यातील अर्थ संदर्भ आणि

वाक्प्रयोग यांच्या परस्परसंक्रियेने बदलतो, हे स्पष्टच आहे. तेव्हा या घटकांच्या परस्परसंक्रिया त्यात कमी-जास्त प्रमाणात महत्त्वाच्या आहेत, असे म्हणायला हरकत नाही.

३) 'प्रकरण' हा शब्द मी वेदांताच्या चर्चेमधून घेतलेला आहे आणि तो अतिशय समर्पक वाटतो. एखाद्या विषयाची चर्चा चाललेली असताना, त्यामध्ये कोणत्याही स्वरूपाचे विषयांतर मान्य करता येत नाही. त्यात आढळणाऱ्या अवघड वाक्यांचे/शब्दांचे अर्थ त्या विषयाच्या व्याप्त्यनुसार लावायला हवे, मग अन्य संदर्भात त्याचे अन्य काही अर्थ होतात, ते त्या प्रकरणात मान्य होत नाहीत. उदा., छांदोग्यात 'यदग्ने रोहितं रूपं... तेजस्तद्रूपं,... यत्कृष्णं तदन्नस्य' असे म्हटले, तर त्यातील 'अन्न' शब्दाचा अर्थ काय, हे सांगताना भगवान सूत्रकार सांगतात, की प्रस्तुत प्रकरण हे (महा) भूतांच्या स्वरूपाचे आहे, कारण त्यात तेज आणि आप यांचा आधीच उल्लेख झालेला आहे. म्हणून 'अन्न' या शब्दाचा अर्थ 'पृथ्वी' असा लावायला हवा. छांदोग्यातील मूळ वाक्य 'यदग्ने रोहितं रूपं तेजस्तद्रूपं, यच्छुक्लं तदपां, यत्कृष्णं तदन्नस्य' असे असून भगवान सूत्रकारांचे सूत्र 'पृथिव्यधिकाररूपशब्देभ्यः' असे आहे.

४) 'भाषेची यदृच्छता', भाषा आणि जीवन, वर्ष १४ वे, अंक ४, पृ. २१

५) भाषेची नियमबद्धता ही निसर्गाच्या नियमबद्धतेइतकी भरवशाची नाही. पण निसर्गाच्या नियमबद्धतेवरही फार भरवसा ठेवता येईल, असे नव्हे.

६) सार्वमत हा भाषाव्यवहाराचा पाया आहे, हे खरे; पण एकदा नियमबद्धता त्यात आली, की मग सार्वमताचेही स्वातंत्र्य संपलेले असते. त्याला कार्यकारणभाव म्हणावे, की नाही, हे मात्र शंकास्पद आहे.

७) अपूर्ण आणि अमूर्त हे दोन्ही शब्द मी इंग्रजीतील abstract या शब्दाच्या अर्थाने वापरतो हे अनेक ठिकाणी स्पष्ट केलेले आहे. काही ठिकाणी दोन्ही शब्द उपयुक्त ठरतात, तर काही ठिकाणी एकच शब्द उपयुक्त ठरेल. ते त्या त्या विषयाच्या स्वरूपावर अवलंबून आहे.

८) प्रत्यक्ष भाषाव्यवहाराचे नियम वेगळे आणि भाषाविज्ञानातील चर्चेत येणाऱ्या भाषेचे नियम वेगळे असतात, की काय, असे इथे वाटू शकेल. अर्थातच तसे नाही, हे मी वेगळे सांगायला नको. प्रत्यक्ष भाषाव्यवहाराचे नियम या phrase ने मला pragmatics अभ्यास अपेक्षित आहे, एवढेच.

९) एकदा भाषेचे नियम बांधले गेले, की तिच्यातील यदृच्छतेचा भाग हलके हलके नष्ट होत जातो. तो पूर्णपणे नष्ट होणार नाही, हे मान्य; पण भाषा पूर्णपणे यदृच्छ राहणार नाही, हेही तितकेच खरे.

१०) पाहा शैलेश सदाशिव पुंडलीक, भाषा आणि जीवन १३:३ पृ. २०

११) Componential Analysis च्या प्रक्रियेत + male + Human वगैरे

सांगण्याची एक चांगली पद्धत आहे, हे खरे, पण त्या गुणधर्मांचा समुच्चय म्हणजे शब्दाचा अर्थ, असे म्हणणे मात्र बरोबर नाही. त्या गुणधर्मातही काही परस्परसंक्रिया होऊन शब्दाचा अर्थ तयार होत असावा, जसे : निळा आणि पिवळा रंग एकत्र करून हिरवा रंग तयार होतो. पण त्याचे सुसूत्र, सुस्पष्ट विवेचन करण्यासाठी इथे पुरेशी जागा नाही.

१२) इंग्रजीत Can, may, must, shall, will वगैरे शब्द वाक्यांचा अर्थ 'mood' सांगतात, म्हणून त्यांना modals असे म्हणायची प्रथा आहे. उदा., may ने परवानगी, तर can ने परवानगी, क्षमता वगैरे अर्थ ध्वनित होऊ शकतात. हे शब्द वाक्यामध्ये सहाय्यक क्रियापदाची भूमिका करताना आढळतात. त्यामुळे त्यांना modal verbs असेही म्हणता येते. उदा., I can swim या वाक्यातील can हा शब्द साहाय्यकारी क्रियापद आहे. कारण त्यामध्ये वर्तमानकाळाचे रूप आढळते. भूतकाळाचे रूप दर्शविण्यासाठी त्याचे रूप could असे होते. मात्र modals चा अभ्यास किचकट असून, त्यातील वर्तमान, भूत वगैरे काळांचा विचार इतका सोपा नाही. या टीपेचे तात्पर्य इतकेच, की modals ही क्रियापदे आहेत.

१३) 'शकते' हे रूप मराठीत नपुंसकलिंगी आणि स्त्रीलिंगी सुद्धा आहे. पूर्वी त्यातील फरक अनुस्वाराने दाखविता येत असे. सध्याच्या काळात ते शक्य नाही. महत्त्वाचा मुद्दा असा, की मराठीत इतरही शकतो, शकतात वगैरे रूपे उपलब्ध होतात. त्यामुळे मराठीत संदिग्धता निर्माण होण्याची- म्हणजे modal च्या कारणामुळे- शक्यता फारशी वाटत नाही.

१४) फ्रेंचमध्ये सुद्धा सर्वच नामे on ने तयार होतात, असे नव्हे. उदा., ecrir 'लिहिणे' या क्रियापदापासून ecriture 'लिखाण, लेखन' असे नाम तयार होते. पण जिथे शक्य आहे, अशा शब्दात on वापरून नामे तयार केली जातात. उदा., examination. इंग्रजीतील बरीचशी म्हणजे सुमारे पंचवीस टक्के शब्दसंपदा ही फ्रेंचमार्गे लॅटिनमधून आलेली आहे आणि ती बरीच शतके फ्रेंच राज्यकर्त्यांची भाषा असल्याने, उच्चभ्रू आणि निम्नभ्रू अशा इंग्रजीतील क्रियापदात्मक नामांची on ने तयार होणारी / न होणारी रूपे असा फरक पडला असावा.

१५) Flying planes ची रचना अनवधानाने झालेली आहे, असे म्हणण्याचे कारण सर्वसाधारणपणे कुणीही मुद्दाम संदिग्धतापूर्ण बोलणे करीत असेल, असे वाटत नाही. पण कुणी मुद्दाम संदिग्धतापूर्ण बोलण्याची शक्यता मात्र नाकारता कामा नये.

१६) पाहा शैलेश सदाशिव पुंडलीक, भाषा आणि जीवन १४:४, पृ. २१-३३

**भाषाशिक्षण विभाग, श्री.ना.दा.ठा. महिला विद्यापीठ, मुंबई ४०००२०.**

❐❐

# डॉक्टर-रुग्ण संवाद

सुधा क्षीरे

डॉक्टर-रुग्ण संवाद ही तशी मानवी जीवन-व्यवहारात काही नवीन गोष्ट नाही. पण आजच्या काळात त्यांच्या नात्याचे स्वरूप खूपच बदलते आहे, बरेच व्यामिश्र झाले आहे आणि म्हणून त्याबाबत नव्यानं विचार करायची गरज जाणवते आहे. पूर्वीच्या जमान्यात कुटुंबातल्या आजी-आजोबांपासून नातवडांपर्यंत सर्वांनाच 'बघणारा' एक 'फॅमिली डॉक्टर' असे. शिवाय हा डॉक्टर (किंवा वैद्य) आणि रुग्ण यांचे बहुधा पिढ्यान् पिढ्यांचे संबंध असत. आजाराचे किंवा दुखण्यांचे स्वरूपही जास्तकरून मामुली किंवा जुजबी (ताप, सर्दी, खोकला, डोकेदुखी) असे असे. मात्र प्लेग किंवा एन्फ्लुएंझा यांसारख्या भयानक साथीचे रोग म्हणजे अस्मानी संकटच ठरले होते.

पण जेव्हा आधुनिक वैद्यकाने या व इतर कितीतरी साथींचा मुकाबला केला, काहींचा पूर्ण बीमोड केला आणि काहींवर रामबाण उपचार शोधले, तेव्हा या अस्मानी संकटाविरुद्ध लढण्याची शस्त्रे डॉक्टरांच्या हातांत गेली. मानवी शरीररचनेचा सखोल, सविस्तर अभ्यास होऊन, एकेका अवयवाचे विशेषज्ञ (specialist) डॉक्टर ही संकल्पना आली आणि आहार, व्यायाम, आणि आरोग्यपूर्ण पर्यावरण यांच्यांतल्या कमतरतेने रुग्णांच्या दुखण्यांचे, आजारांचे स्वरूप खूपच गुंतागुंतीचे झाले.

अर्थातच, डॉक्टर-रुग्ण व्यवहारातला सहजपणा, सोपेपणा गेला आणि अनेकपदरी असी एक नवी व्यवस्था सुरू झाली. त्यात डॉक्टर आणि रुग्ण यांच्याव्यतिरिक्त आधुनिक यंत्र आणि तंत्र, चाचण्या आणि तपासण्या, वेगवेगळ्या उपचारपद्धती, त्यांविषयी विविध संपर्कमाध्यमांनी दिलेली माहिती असे इतर घटक या व्यवहारावर परिणाम करू लागले आहेत. शिवाय बदलते कुटुंबजीवन आणि माणसांमध्ये आलेला चौकसपणा याचाही डॉक्टर-रुग्ण संवादावर परिणाम होतो आहे.

मात्र, या वेगाने बदलणाऱ्या वातावरणातही टिकून राहिलेला या नात्यातला संवादातला सर्वांत मुख्य घटक म्हणजे, रुग्णाची डॉक्टरवरची श्रद्धा! आणि म्हणूनच डॉक्टरांच्या बाजूने हे नातं, हा संवाद आणि त्यातली अर्थपूर्णता कशी जाणवतात, हे समजून घेण्यासाठी मी मला भेटलेल्या, संवेदनशील व्यक्तिमत्वाच्या तीन डॉक्टरांशी या विषयावर चर्चा केली. ते तीन डॉक्टर्स म्हणजे -

१) डॉ. अनंत साठे (शल्यविशारद व स्त्रीरोगतज्ज्ञ)

२) डॉ. सुमति कानिटकर (प्रसूती व स्त्रीरोगतज्ज्ञ)





अनुक्रमणिका

३) डॉ. मो. के. कर्वे (बालरोगतज्ज्ञ)

डॉ. साठे गेली चाळीस-बेचाळीस वर्षे डेक्कन जिमखाना परिसरात आपला व्यवसाय करीत आहेत. त्यांच्या मते, इतर काही व्यवसाय आणि डॉक्टर, वकील व शिक्षक यांचा व्यवसाय (किंवा पेशा) यांत एक मुख्य फरक आहे. तो म्हणजे इतर सर्व व्यवसायांत 'आर्थिक' गुंतवणूक असते आणि त्याच्या मोबदल्यात दिली जाणारी किंवा मिळणारी वस्तू यावर त्या व्यवसायाची यशस्विता अवलंबून असते.

पण डॉक्टरी व्यवसायात 'भावनिक' गुंतवणूक असते. ('अर्थ' व्यवहार असतो. पण तो केंद्रस्थानी नसतो.) आणि म्हणूनच या नात्यात 'संवादा'ला एक वेगळे महत्त्व असते. इथे त्या त्या व्यक्त्यनुरूप 'भाषा' बदलत जाते. तो बोलत असतो मराठी, हिंदी किंवा इंग्रजीच! पण त्याची स्वतःची म्हणून एक वेगळी 'भाषा' असते. कारण तो एखाद्या दुखण्याचं किंवा आजाराचं निमित्त घेऊन आलेला असला, तरी त्याच्या संपूर्ण व्यक्तिमत्त्वानिशी आलेला असतो. त्याची एक 'मानसिकता' असते. त्याच्या बोलण्या-चालण्यांतून ती व्यक्त होत असते.

डॉ. म्हणाले, 'पेशंटची ही 'भाषा' त्याच्या हावभावांतून, मुद्रेतून, उद्‌गारांमधून हळू हळू कळायला लागते, वाचता यायला लागते. हा एक खास अनुभव असतो.

काही रुग्ण आल्याक्षणी आपल्या दुखण्याबद्दल सांगून टाकतात आणि आमचं निदान जाणून घ्यायला उत्सुक चेहऱ्यानं बसतात. तर काही इतर खूप गोष्टी सांगत राहतात, मुख्य दुखण्याविषयी अगदी शेवटी सांगतात आणि एकदम गप्प होतात.'

आता इथे न बोललेला संवाद बराच असतो.

'एखाद्या ऑपरेशनच्या शक्यतेनं आम्ही धास्तावलो आहोत. ते करावं लागणार?'

'माझी लक्षणं फार विचित्र वाटतात. काही गंभीर आजार तर नाही?'

'पहिले डॉक्टर 'असं असं' म्हणाले. तुमचंही मत तेच का?'

वगैरे वगैरे. आमच्या 'नवख्या' दिवसांत हे 'वाचता' येत नाही. नंतर त्या त्या पेशंटची मानसिकता समजायला लागली की, आमचा संवाद बदलत जातो. त्याच्या मनात नेमका कोणत्या प्रकारचा ताण (टेन्शन) आहे, हे लक्षात घेऊन मग आम्ही बोलू लागतो.

तसंच, आपल्या दुखण्याविषयी बोलताना, 'लक्षणं' सांगताना रुग्ण वेगवेगळे किंवा अपुरे शब्द वापरतात. जसं 'डॉक्टर, मला फार भणभणल्यासारखं होतं डोक्यात!' आता हे 'भणभणणं' आमच्या भाषेत समजण्यासाठी आम्हांला त्याला खूप प्रश्न विचारावे लागतात. 'स्वस्थ पडलात की, भणभणणं थांबतं, का कामात मन व्यग्र झाल्यावर? खाल्ल्यावर बरं वाटतं, का फिरल्यावर?' असं विचारत विचारत 'भणभणणं' समजून घ्यावं लागतं.

कधी रुग्ण म्हणतो, 'डॉक्टर, डोकं फार दुखतं, हो.' आता डोकं म्हणजे कपाळ, मस्तक का अर्धशिशी? शिवाय केव्हा? कसं? किती? असं कितीतरी उरतंच. हे सगळं कळणं आमच्या निदानाच्या दृष्टीनं महत्त्वाचं असतं. यासाठी त्याला बोलतं करणारा संवाद

साधावा लागतो.

नाहीतर मग अपुऱ्या संवादानं चांगलीच गफलत होऊ शकते. याचं एक गमतीदार (?) उदाहरण डॉक्टरांनी सांगितलं.

एक रुग्ण छातीवर हात फिरवत 'इथं जळजळ होते, आग होते.' सांगू लागला. दोन-तीन डॉक्टर्सकडे गेला होता. त्यांनी अर्थातच ॲसिडिटीवरची औषधं दिली होती. पण काहीच फरक नाही. 'केव्हा नि कसं जळजळतं?' या प्रश्नानंतर खोलात शिरल्यावर नि तपासल्यावर लक्षात आलं की, छातीवर चट्टा होता. त्याविषयी तो बोलत होता. तेव्हा, वेळेअभावी काही गृहीतं मनात ठेवून, घाईघाईनं निदान करणं दिशाभूल करणारं ठरतं. तेव्हा तपशीलवार संवादाला पर्याय नाही.

- आणि त्यात जर केस 'ऑपरेशन'ची असेल, तर संवादात अनेक पथ्यं पाळावी लागतात. शब्दांची निवड विचारपूर्वक करावी लागते. जसं, पोट फाडणं. ऐवजी पोट उघडून बघू. 'नर्व्ह कापतो' ऐवजी 'आम्लपित्ताचा' प्रभाव कमी होईल, असं काही करतो.' असं वेगळ्या तऱ्हेनं सांगणं.

'ऑपरेशन' या शब्दाभोवती थोडं भीतीचं वलय आहेच. पण कधी कधी, ऑपरेशनची गरज नाही, असं सांगितल्यानं संभ्रमात पडणारेही रुग्ण आहेत. ते पटवताना संवादातलं कौशल्यच वापरावं लागतं.'

या डॉक्टर-रुग्ण व्यवहारात पेशंटकडून काही गोष्टी हमखास अशा घडतात की, ज्या सु-संवादात अडथळा आणतात, असे डॉ. साठे यांनी निदर्शनाला आणून दिले. त्या म्हणजे दुखणे अंगावर काढून उशिरा डॉक्टरांकडे येणे, दिलेल्या वेळेवर न येणे, अपॉईंटमेंट न घेता येणे, औषधांची नावे विसरणे, स्वतःच्या चुका सांगायचं टाळणे. इत्यादी! अशा वेळी डॉक्टरांचीही मनःस्थिती बिघडते. चिडचिड होते. दोघांच्या संवादातला तो मोठा अडथळा ठरतो.

पण हा अडथळा दूर करण्यासाठी दोन प्रकारे विचार करता येतो. एक, रुग्ण हा एक माणूस आहे. विसरणे, दुर्लक्ष करणे, वगैरे सवयी 'मानवीय' आहेत, याचे भान ठेवणे आणि त्याच्या आत्मसन्मानाला धक्का न लावता त्या 'चुकां'विषयी त्याला जाणीव करून देणे व त्या बदलायला मदत करणे. यातऱ्हेनं डॉक्टरनं आपलं समजून घेणं विकसित केलं, तर संवाद खूप बदलतो.

'अपॉईंटमेंट न घेता येताच कसे तुम्ही लोक?' याऐवजी ''अपॉईंटमेंट' घेऊन आला असतात, तर तुमचा वेळ वाचला असता. पुढची वेळ ठरवू या का आता?' या दिशेनं तो संवाद जातो.

'तुम्ही शिकलेले लोक. औषधाचं नाव नाही सांगता येत?'याऐवजी 'काही काही औषधांची नावं रोजच्या बोलण्यातली नसतात ना? पुढच्यावेळी आठवणीनं प्रिस्क्रिप्शन आणा, म्हणजे औषधात गोंधळ नको.''

मुद्दा तोच आहे. पण दुसऱ्या प्रकारच्या संवादात तुमच्या या सवयीनं तुमचं नुकसान

होतंय्, ते आपण टाळू शकतो, असा सामंजस्याचा भाव आहे, जो या संवादातलं, नात्यातलं, जीवनव्यवहारातलं सौहार्द व्यक्त करीत असतो.

या सौहार्दामुळंच रुग्णाइतकीच रुग्णाच्या नातेवाइकांचीही मनःस्थिती - विशेषतः ऑपरेशनच्या वेळची डॉक्टरला जाणवू लागते. त्यामुळे त्यांच्याशी संवाद साधतांना तो आधी ऑपरेशनच्या सर्व पायऱ्या (stages) त्यांना समजावून सांगायचा प्रयत्न करतो. ऑपरेशनला ठरल्यापेक्षा बराच वेळ अधिक लागणार, असं वाटलं, तर 'थिएटर' बाहेर निरोप देण्याची व्यवस्था करतो, अधिक वेळ का लागला, हे नंतर सोप्या भाषेत त्यांना समजावून सांगू पाहतो. रुग्णाइतकाच रुग्णाच्या नातेवाईकांबरोबरचा हा संवाद डॉ.ना फार महत्त्वाचा वाटतो. कारण त्यामुळं रुग्णाभोवतीचं वातावरण समाधानी राहतं आणि डॉक्टर-रुग्ण संवादात एक अनोखा जिव्हाळा येतो.

हा जिव्हाळा खाजगी प्रॅक्टिसमध्ये डॉक्टर-रुग्ण नात्यात सहजपणे निर्माण होतो. पण जनरल हॉस्पिटलमधले अनुभव अर्थातच वेगळे असतात. त्याविषयी डॉ. सुमति कानिटकरांशी बोलले. मुंबईच्या लोकमान्य टिळक रुग्णालयातला अशा डॉक्टरी जीवनाचा तीस वर्षांचा अनुभव त्यांना आहे. त्या तिथे प्रसूतिशास्त्र विभागाच्या प्रमुख म्हणून काम पाहत होत्या.

डॉ. कानिटकरांचं म्हणणं असं की, डॉक्टर-रुग्ण संवादाला जनरल हॉस्पिटलचं वातावरण अगदीच प्रतिकूल असतं, आणि त्याला ती व्यवस्था कार्यपद्धती (system) अधिक जबाबदार आहे. तिथे येणारे मानद डॉक्टर्स (ऑनररीज्) हे जणू उपकाराच्या भावनेतून काम करत असतात. शिकाऊ डॉक्टर्स हे तसे एकूण हे काम फारसं गंभीरपणे घेत नसतात आणि बिचारे रुग्ण मात्र परिस्थितीने कमकुवत असतात. म्हणून एक प्रकारचा दबलेपणा त्यांच्या वागण्यात असतो. त्यामुळे इथे डॉक्टर-रुग्ण नात्यात दरी फार असते आणि त्याचा त्यांच्यांतल्या संवादावर होतो. म्हणजे 'संवाद' पुष्कळदा जवळजवळ शून्यावरच आलेला असतो.

'पण ही दरी ओलांडून रुग्णांबरोबर मायेने, प्रेमाने संवाद साधणारे तळमळीचे डॉक्टर्स मी पाहिले', (डॉ. म्हसकर, डॉ. फडके यांच्यासारखे) डॉ. कानिटकर म्हणाल्या, 'आणि त्यांचा प्रभाव आमच्या मनावर असल्याने मी जनरल हॉस्पिटलच्या त्या वातावरणातही खूपसा संवाद करत असे.'

त्या रुग्णांशी बोलण्यात पुष्कळदा मुख्य अडचण भाषेची असायची. कारण तसं मुंबईमध्ये एकूणच कॉस्मॉपॉलिटन' वातावरण आणि या हॉस्पिटलमध्ये 'धारावी' तल्या बायका जास्त करून असायच्या. त्यामुळे 'बॉम्बे हिंदी' वर कसंबसं भागवून न्यावं लागायचं. कोणी मराठी-हिंदी जाणणारी असेल, तर दुभाषी म्हणून काम करायची.

पण या सर्वांपलीकडे 'दुखण्याची' म्हणून एक भाषा असते, जी कळवळ्यामुळे कळते. 'बोलीभाषा' कमी कळते, म्हटल्यावर रुग्णाचे हातवारे, हावभाव, हसणं,

ओशाळणं, यांतून मी त्यांचं मन वाचायला शिकले. कारण शारीरिक दुखण्याइतकीच सामाजिक - सांस्कृतिक परिस्थितीतून येणारी 'मानसिक' दुखणीही त्या सोसत असायच्या.'

'यातलं एखादं खास उदाहरण सांगायचं, तर...' डॉ. म्हणाल्या, 'फाळणीनंतर मुंबईत आलेल्या काही निर्वासित बायकांची मासिकपाळी तीन-तीन वर्षं आली नाही आणि जसंजसं त्यांचं आयुष्य स्थिरावलं, तशी पुन्हा नियमित सुरू झाली. तेव्हा मनाला बसलेला हबका शरीराला किती जाणवतो, हे त्यांच्या बरोबरच्या संवादांतून मला कळलं- ज्यातले सगळे शब्द कदाचित नाही, पण भावना माझ्यापर्यंत पोचली होती.'

सहानुभूतीप्रमाणेच 'स्वानुभव' सुद्धा आपला संवाद समजुतदार करतो, असाही एक छान अनुभव डॉक्टरांनी सांगितला-

'आधी आधी मी बिचाऱ्या 'प्रेग्नंट' बायकांना 'हं, चला, चला आटपा' असं म्हणायची. पुढं मी स्वतः जेव्हा गर्भारपण बाळंतपण अनुभवलं, तेव्हा मी सौम्यपणे बायकांशी बोलू लागले. या काळात हालचाली करणं कसं जड जातं, याचा मी अनुभव घेतला, तेव्हा माझी भाषा मृदू झाली.'

म्हणजे वयाबरोबर, अनुभवांतून डॉक्टरची विचारांची भावनांची परिपक्वताही वाढत गेली, तर डॉक्टर-रुग्ण संवादात ओलावा येतो. शारीरिक दुखण्यांच्या औषधांविषयी त्यांना शिकवलेलंच असतं. पण मन जाणून मायेनं वागणं-बोलणं मात्र शिकावं लागतं. एकदा या वाटेवर प्रवास सुरू झाला की, एखाद्या मुद्द्यावर रुग्णाशी पुढं बोलणं अशक्य, असं वाटता-वाटताच संवादाची वेगळी दिशा आणि भाषा सापडते.

तसाच एक अनुभव डॉक्टर सांगत होत्या.

एक स्त्री-पेशंट. तिला वाटे, आपण प्रेग्नंट आहोत. खरं तर नव्हती. पण हे तिला पटेचना. समजूत कशी काढावी? ऐकायलाच तयार नाही. दुसरी एक बाई प्रेग्नंट होती. तिचा एक्स-रे काढला, हिचाही काढला. सांगितलं, बघ हिच्या पोटात बाळ दिसतंय्. तुझ्या आहे का? मग तिला पटलं.

संवादाचा हा मार्ग केवळ तिच्याविषयीच्या कळवळ्यामुळेच डॉ.ना सुचला. नाही तर 'तू प्रेग्नंट नाहीयेस. चला, पुढचा पेशंट घ्या...' या वाक्यावर जबाबदारी संपवता येतच असते. पण संवादशील डॉक्टरच्या लेखी 'परदुःख इतकं शीतळ' राहत नाही. म्हणून कधी कधी मग तपासणीचे निष्कर्ष सांगताना शब्द अडखळतात.

डॉ.कडे आलेली एक केस होती. मुलीचं नाव सुंदरी. वय असेल अठरा-एकोणीस! अजून हिची मासिकपाळी सुरू नाही, म्हणून भावजय तिला घेऊन आलेली. तपासलं निष्कर्ष फार धक्कादायक- तिला गर्भाशय नव्हतं. जनरल हॉस्पिटलमधल्या भरगच्च ओ.पी.डी.त तिच्यासाठी वेळ तरी किती देता येणार? पण मग डॉक्टर तिच्या भावजयीशी बोलल्या. 'काळजीचं तसं कारण नाही. तिची प्रकृती तशी छान आहे.' असं 'तसं, तशी,'

शब्दांचा आधार घेत घेत अखेर सांगितलं - 'तिला गर्भाशय नाही. पण vagina अतिशय व्यवस्थित आहे.' नंतर 'तिचं लग्न' या विषयावरही डॉक्टरनी भावजयीला व्यवस्थित सल्ला दिला, मार्गदर्शन केलं. तपासणीचे निष्कर्ष सांगितल्यानंतरचा हा सगळा संवाद डॉक्टरमधला 'माणूस' रुग्ण या माणसाशी करत असतो. मग ही माणसं खाजगी हॉस्पिटलमध्ये भेटोत किंवा जनरल हॉस्पिटलमध्ये- माणुसकीचा ओलावा आटत नाही, संवाद तुटत नाही.

संवाद तर तुटत नाहीच, इतकंच काय, पण जन्मभराची नाती जोडली जातात, असे हृद्य अनुभव डॉ. कर्वे यांनी आमच्या चर्चेच्यावेळी सांगितले. गेली तीस वर्षं ते बालरोगतज्ज्ञ म्हणून डॉक्टरी व्यवसायात आहेत. तसे या डॉक्टरांकडे येणारे खरे रुग्ण छोटे! अर्थात डॉक्टरांचा अधिक संवाद होतो, तो त्यांच्या आईबाबांशी!

डॉक्टर म्हणाले,

'त्यांच्या मानसिकतेतला मला जाणवलेला एक मुख्य फरक म्हणजे पूर्वी लोक विचारत नसत 'डॉक्टर, या मुलाला काय झालंय्', आता मात्र हमखास विचारतात तसं! ही एक वैद्यकीय साक्षरतेची खूण म्हणावी लागेल. पण त्याचबरोबर आमच्या नात्यावर काहीसं अविश्वासाचं सावट आलेलं आहे, असंही जाणवतं. काही वेळा पालक मुलांना आमच्याकडे आणण्यापूर्वी थोडी फार औषधंही स्वतःच्या मनानं देतात आणि आल्यावर सांगतात- 'डॉक्टर, क्रोसिन दिलं. पण ताप नाही उतरला.' असे जुजबी औषधोपचार ठीकच म्हणायचे. पण एकूण घरगुती औषधोपचार केव्हा, कोणते, किती, हे ठरवणं- विशेषतः छोट्या मुलांच्या बाबतीत - फार काळजीपूर्वकच करावं, हे मात्र मी पालकांना आवर्जून सांगतो. अर्थात आम्ही त्यांना सल्ला देणं अपेक्षितच आहे. पण खरी गंमत अशी की, हे लोकही आम्हांला सल्ले देतात-' डॉ.नी हसत हसत सांगितलं- ते असे- 'डॉक्टर, अँटीबायोटिक्स फार नका हं देऊ' किंवा 'वायसोलनने उंची खुंटते, म्हणतात, ते नका देऊ.'

या संवादामागे असते संपर्कमाध्यमातून त्यांना मिळालेली माहिती! वृत्तपत्रामधले लेख किंवा रेडिओ, टी.व्ही. वरच्या चर्चा यांतून काही माहिती त्यांना मिळालेली असते- औषधांविषयी, उपचारांविषयी आणि त्यांचे प्रतिबिंब या संवादातून उमटत असतं. आता अशी माहिती पुष्कळदा एकांगी (one sided), अपुरी असू शकते. पण अशा चर्चांना आम्हांला वेळ कुठे असतो? त्यामुळं मी शांतपणे एवढंच म्हणतो, 'माझ्या हातांत मूल आहे, तोवर काळजी नका करू.' आनंदाची गोष्ट अशी, की या शांत, सस्मित आणि स्थिर बोलण्याचा त्यांच्यावर नेहमीच अनुकूल परिणाम होतो.

मात्र एका बाबतीत मुलांचे पालक विशेषतः आया- थोड्या नाराजच राहतात, असं मत डॉक्टरांनी नोंदवलं. ते म्हणजे टॉनिक! बहुतेक आयांच्या मते त्यांची मुलं पुरेसं खात/ जेवत नसतात आणि म्हणून एखादं टॉनिक लिहून देण्याची त्यांची मागणी असते. डॉक्टर जेव्हा सांगतात त्याची गरज नाही, तेव्हा त्या गप्प बसतात खऱ्या; पण त्यांचा चेहरा सांगत

असतो, की हे काही पटलं नाही. 'ते' वाचता येतं. शक्य असेल, तर मी टॉनिक का देत नाही, हे मी पटवून सांगतोही. पण फारसं यश नाही याबाबतीतल्या संवादात', असा डॉ.चा अनुभव! पण फारसं काही बिघडत नाही. कारण मुलांच्या बाबतीत अति काळजी घेतलेली परवडते; पण निष्काळजीपणा कधीच नाही.

डॉ. कर्व्यांच्या मॉडेल कॉलनीजवळच्या हॉस्पिटलजवळ जी वडारवाडी आहे, तिथून येणाऱ्या लोकांच्या बाबतीत तसे अनुभव येण्याची शक्यता जास्त! तिथेही अर्थात पूर्वीपेक्षा आता एकूण जागरूकता (awareness) आहे. पण अज्ञान, गैरसमज त्यांची खास भाषा, काही संशय असे अडथळे संवादात येतातच.

मुलाला झालेला असतो न्यूमोनिया. त्यानं छाती भरलेली. त्यामुळे पोट उडत असतं. याला ते 'पोटातलं झालंयू' म्हणतात. दुखणं पोटात नसून छातीत आहे, हे पटवणं फार मुश्कील.

तसंच आहे दुसरं. कफ साठल्यानं घशात घरघर असते. हे म्हणतात, 'जन्माच्या वेळी घशातलं 'बळसट' नाही काढलं गेलं, म्हणून असं वाजतंयू.' मग कधी समजावून, कधी जरा रागावून सांगावं लागतं. पण हेही खरं की, आमचा रागवायचा अधिकारही त्यांनी मान्य केलेला असतो.

- आणि त्यांच्या मनातल्या काही भावना पण खुलेपणानं दर्शवून जातात. काही जणांची सवय अशी की, बाळाला काय काय होतंयू, ते जरा फुगवूनच सांगतात. ३-४ पर्यंत ताप होता, असं सांगतात. तपासावं, तर तसं काही दिसत नाही. मग असं का? प्रथम प्रथम मला कळत नसे. नंतर अंदाज येत गेला की, असं नाही सांगितलं, तर डॉक्टर नीट लक्ष नाही देणार, असा समज त्यांच्या मनात पक्का होता. हे अर्थात शब्दांच्या भाषेवाचून समजलं- अनुभवातून!

'अनुभवामुळे तर संवाद खूप बदलला. जसं, पूर्वी काही आजारापणाबद्दलच्या यांच्या अंधश्रद्धा म्हणजे थोतांड वाटायचं. काविळीला 'माळ' कसली घालतायू? असं म्हणायचो. जशी या माणसांची मानसिकता समजत गेली, तसं मी म्हणू लागलो 'माळ'ही ठेवा, औषधंही द्या. म्हणजे एकूण या नात्यातून, संवादातून मी या माणसांना अधिक समजू शकलो', असं डॉक्टरांना वाटतं.

एकूण या तिघांच्या चर्चेतून डॉक्टर-रुग्ण संवादाचे त्यांचे त्यांचे स्वतंत्र अनुभव तर हाती आलेच. शिवाय काही सर्वांना समान (common) मुद्देही समोर आले. त्यांत एक असा की, या संवादात (अर्थात् इतर अनेक क्षेत्रांपमाणे) इंग्रजी सोपं आणि मराठी अवघड, अशी स्थिती पुष्कळदा येते. कारण बरेचसे इंग्रजी शब्द इतके रुळले आहेत- जसे डॉक्टर, पेशंट, नर्स, ऑपरेशन थिएटर, हॉस्पिटल, वगैरे तेच सर्वांना सहज समजतात. कधी तर अशी गंमत घडते की, डॉक्टर एखादी गंभीर गोष्ट बाजूबाजूनं सोप्या मराठीत सांगतात, तर खेडूत





अनुक्रमणिका

पेशंट म्हणतो 'म्हंजे, 'सिरियस' हाय म्हना की!' पण कधी कधी एखादी कल्पना समजावून देणं फार अवघड होतं- जसं incomplete abortion! उलट, काही शब्द फार माहितीचे आणि धसक्याचे. म्हणून ते डॉक्टरांना आठवणीने टाळावे लागतात. जसं- टी.बी., टॉयफॉईड! अशा वेळी रुग्णांसमोर खास पारिभाषिक संज्ञा नर्सशी किंवा 'असिस्टंट'शी बोलताना वापराव्या लागतात. या पारिभाषिक संज्ञांची पण संवादात दुहेरी गंमत होते. पुष्कळदा त्यांतून रुग्णाला अर्थबोध काही होत नाही, पण डॉक्टर 'बडे' आहेत, असा आदरभाव मात्र रुग्णाला वाटतो.

अर्थात्, या झाल्या या संवादातल्या काही छोट्या छोट्या गोष्टी! सर्वांनी आवर्जून सांगितलेल्या हकीगती अशा रुग्णांच्या होत्या ज्यांच्या आयुष्यात जीवनमरणाचे प्रश्न किंवा प्रसंग उभे राहिले होते. आपले डॉक्टर त्यांना त्या त्या वेळी साक्षात देव किंवा देवदूत वाटले होते. डॉक्टरांच्या अथक प्रयत्नांनंतरही जेव्हा मृत्यू थोपवता आला नाही, त्या वेळी - जीवनाचे अखेरचे क्षण मोजताना या रुग्णांनी आपल्या डॉक्टरांनाच हाक घातली होती, त्यांची वाट पाहिली होती आणि त्यांचा हात हातात घेऊनच इथला प्रवास संपवला होता.

त्या त्या वेळी त्या विझत्या डोळ्यांमध्ये श्रद्धेचे, विश्वासाचे, आत्मीयतेचे जे भाव उजळले होते, ते या नात्यातले, या संवादातले अविस्मरणीय क्षण होते. त्या संवादाचा अर्थ ज्यांच्यापर्यंत पोचला, ते डॉक्टर, स्वतःच्या व्यवसायाकडे केवळ व्यवसाय म्हणून पाहू शकत नाहीत. जीवनाबद्दलची जाणीव समृद्ध करणाऱ्या अशा आठवणी हाच डॉक्टर-रुग्ण संवादाचा खरा गाभा!

**१७, सायंदीप, गणंजय सोसायटी (क्र.२), कोथरूड, पुणे ४११०२९.**



---

## काही सुभाषिते

Good times Bad times Books are for all times.

राष्ट्रीय ग्रंथमेळा, हैदराबाद १९९६ : ११ : ३० - १२ : ०८, बोधवाक्य (आजच्या bad times मध्ये अधिकच भेदकपणे जाणवणारे सत्य - या बोधवाक्याचा कुणी वाचक सुयोग्य मराठी अनुवाद करून पाठवणार का?)

पुस्तकाच्या प्रेमात पडलं की अखेर आपल्याला वाटू लागलं की तेच आपल्या प्रेमात पडलंय.

निकोल व्हेद्र (१९११-१९६५) फ्रेंच पत्रकार, मेर्क्यूर द फ्रास पत्रातील पारि या स्तंभात.

ज्याला थोडं तरी नीट वाचता येतं तोच काही बरं लिहू शकेल.

क्लोमां मारो (१४९६-१५४४) फ्रेंच कवी, एपीत्र (पत्रं) या संग्रहातून.

# ‘मऱ्हाटी संस्कृती : काही समस्या’ एक वाटचाल’

डॉ. वसंत स. जोशी

साहित्य आणि संस्कृतीच्या क्षेत्रातील ‘संशोधनाचे कोलंबस’ म्हणून ज्यांचा निर्देश केला जातो, ते कर्नाटकातील सुप्रसिद्ध विचारवंत आणि संशोधक डॉ. शं. बा. जोशी यांच्या जन्मशताब्दीचे हे वर्ष आहे. कन्नडमधील अनेक कथा - कादंबऱ्यांची भाषांतरे अलीकडे मराठीमध्ये प्रसिद्ध झाली आहेत. पण कन्नड आणि मराठी या उभय भाषांत वैचारिक आणि संशोधनात्मक लेखन करून मान्यता पावलेले डॉ. शं. बा. जोशी हे एकमेव लेखक होत. त्यांची घरची आणि मातृभाषा मराठी असली, तरी कन्नडमध्येच त्यांनी विपुल लेखन केले. ‘मऱ्हाटी संस्कृती : काही समस्या’ या त्यांच्या मराठी ग्रंथाच्या दोन आवृत्त्या निघाल्या. शिवाय नवभारत, सत्यकथा, प्रतिष्ठान, महाराष्ट्र टाइम्स, यांसारख्या नियतकालिकांतून त्यांचे संशोधनपर अनेक लेख वेळोवेळी प्रसिद्ध झाले आहेत. त्यामुळे कन्नड इतकेच मराठी अभ्यासकही त्यांच्या विचारांशी परिचित आहेत. प्रज्ञा आणि प्रतिभा यांचा उत्कृष्ट आविष्कार त्यांच्या साहित्यात झालेला आहे.

शं. बां. नी कर्नाटक संस्कृतीची पूर्वपीठिका, तिचा स्रोत आणि पुढील वाटचाल यांचा विद्वत्तापूर्ण शोध घेण्यात आपल्या आयुष्याचा प्रत्येक क्षण उपयोगात आणला. हळूहळू त्यांची दृष्टी सखोल आणि व्यापक होत गेली. त्यांचे अध्ययन-क्षेत्र विस्तृत होत गेले. आपल्या संशोधनाने त्यांनी वादांची वादळे निर्माण केली आणि अनेक प्रस्थापित सिद्धांताविषयी शंका उपस्थित केल्या. त्यांचा मूलभूत, स्वतंत्र दृष्टिकोन, त्यांची विद्वत्ता आणि सांस्कृतिक क्षेत्रातील त्यांचे योगदान यांना विद्वानांकडून मान्यताही मिळाली. संशोधन पद्धतीतील पारंपरिक शिक्षण त्यांनी घेतलेले नव्हते. त्यांचे सिद्धांत बऱ्याचदा स्पष्ट वाटत नाहीत, पण त्यांचा मूलभूत दृष्टिकोन आणि स्फुरलेले स्वतंत्र विचार यांमुळे या मर्यादा केव्हाच ओलांडल्या जातात. त्यांच्या प्रतिपादनात बऱ्याचदा मुख्य सूत्र सुटून जाते. कल्पनारंजित आणि भावनाधिष्ठित विचारात ते हरवते. बऱ्याच वेळा व्युत्पत्तिशास्त्रातील शक्यता हा त्यांना एक खेळ वाटतो. तथापि, त्यांच्याजवळ मूलभूत संशोधनदृष्टी होती व त्यांच्या ग्रंथांत अनेक संशोधन प्रकल्पांना पुरणारे विचारधन सामावलेले आहे, हे नाकारता येणे शक्य नाही. त्यांच्या लेखनातून प्रकट होणारे नवनव्या विचारांचे स्फुलिंग अभ्यासकांना

स्तिमित करतात. वेदवाङ्मय, भाषा- विज्ञान आणि मानववंशशास्त्र यांचा गाढा व्यासंग, त्याला लाभलेली नवनवोन्मेषशाली प्रज्ञेची साथ यामुळे त्यांच्या विचारांची झेप विलक्षण असते. आणि ती आवाक्यात आणणे अवघड असते. वर्तमानाहून कित्येक योजने दूर असलेले व केवळ तर्काधिष्ठित म्हणून न पटणारे त्यांचे सिद्धांत कालांतराने मान्यता पावतात, असा अनुभव आहे., ''मऱ्हाटी संस्कृती : काही समस्या, या त्यांच्या ग्रंथाबाबत सुद्धा प्रारंभी विरोध आणि नंतर स्वीकार अशीच प्रक्रिया घडलेली आहे. या वर्षीच्या डॉ.शं.बा जोशी यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने त्यांच्या मराठीतील या ग्रंथाच्या निर्मितीची प्रेरणा आणि प्रकाशन या संदर्भातील वाटचाल जाणून घेणे वाचकांना उद्बोधक वाटेल.

डॉ.शं.बा. जोशी यांचा जन्म बेळगाव जिल्ह्यातील गुर्लहोसूर येथे ४ जानेवारी, १८९६ रोजी झाला. त्यांचे पूर्ण नाव शंकर बाळ दीक्षित जोशी. त्यांचे कानडी मुलकी पर्यंतचे शिक्षण आपल्या जन्मगावी झाले. नंतर धारवाड येथे प्राथमिक ट्रेनिंग कॉलेजमध्ये त्यांनी प्रशिक्षण घेतले. त्यानंतर प्राथमिक शिक्षक म्हणून चिक्कोडी, उगरगोळ, इत्यादी ठिकाणी त्यांनी काम केले. पुढे नोकरी सोडून त्यांनी स्वातंत्र्य-चळवळीत उडी घेतली. 'कर्मवीर', 'जय कर्नाटक', 'संयुक्त कर्नाटक', 'जयंतीपत्रिका' यांच्या संपादक मंडळात त्यांनी काम केले. उदरनिर्वाहासाठी काही वर्षे त्यांनी विद्यारण्य हायस्कूल येथे शिक्षक म्हणून काम केले. नंतर शिक्षकवृत्ती सोडून अध्ययन व संशोधनाकडे ते वळले. या काळात पुण्याची वसंत व्याख्यानमाला आणि लोकमान्य टिळकांचा 'केसरी' यांचा शं.बां.वर मोठा प्रभाव होता. आपल्या अध्ययन-क्षेत्रातील प्रत्येक गोष्टीस वैज्ञानिक परीस लावून त्यांनी पारखले. गुरुदेव रानडे यांच्या 'उपनिषद् रहस्य' या ग्रंथाच्या भाषांतरात त्यांचा प्रमुख सहभाग होता.

भारतीय स्वातंत्र्याच्या आंदोलनात भाग घेण्यासाठी धारवाडात आल्यानंतर प्रत्यक्ष सार्वजनिक क्षेत्रात भाग घेत, जीवनाचा अनुभव घेता आला, तर उत्तम, असे त्यांना मनापासून वाटत होते. लोकमान्य टिळक, गुरुदेव रानडे, आगरकर ही त्यांच्या आंतरिक प्रेरणेची दैवते याला कारणीभूत होती. पुढे महात्माजींच्या मुळे त्यांना आणखी जोम आला. पण वैवाहिक जीवनात बद्ध असलेल्या माणसास पोटाचा प्रश्न नेहमीच सतावतो. शं.बां.ना शाळा पत्करावी लागली. तथापि, राष्ट्रीय शाळा, वृत्तपत्रे अशा कोणत्याही वृत्तीत त्यांना स्थिरता लाभेना. वेदवाङ्मयाचा त्यांचा अभ्यास आणि सांस्कृतिक समस्यांचे त्यांचे चिंतन सुरूच होते. तत्कालीन संशोधन-क्षेत्रातील अनेक ग्रंथांचा त्यांचा अभ्यास सुरू होता. आजपर्यंतच्या व्यासंगाच्या ध्यासामागील एक-दोन प्रमुख कारणे अशी होती :

१) त्या वेळी (१९२०-३०) चिं.वि.वैद्य प्रभृतींचे म्हणणे चालुक्य राष्ट्रकूटादी राजे मराठेः तर श्री आलूर व्यंकटराव प्रभृति पुढाऱ्यांचे म्हणणे हे राजे कानडी. यात खरे कोणते व खोटे कोणते, हे सामान्य जिज्ञासूंना कळेनासे झाले होते.

२) त्या वेळी त्या भागात होणाऱ्या कुठल्याही सभेत, 'कावेरियिंद, आगोदावरिव इर्द कंनडद जनपद ....,' या किंवा अशा अर्थाच्या ओळींची गाणी कानांवर पडत. शं.बां.च्या

पुढे प्रश्न उभ राहिला, की गोदेपर्यंत कंनडजनपद होते, हे म्हणणे अतिश प्रयोक्तीचे नसेल का? खरे म्हणण्यास पुरावा कोणता?

श्री. श्रीनिवास नारायण राजपुरोहित हे वि.का.राजवाडे यांच्यापासून स्फूर्ती घेतलेले त्यागी गृहस्थ होते. त्यांनी या दिशेने प्रथमतः कार्य केले होते. 'केसरी' मध्ये कानडी संबंधांवर त्यांचे लेखही आले होते. मल्लारी दैवत, काही स्थलनामे, पंढरी विठ्ठल कानडा हो अशा उल्लेखांचा त्यांनी उत्तम पुरावा मांडला हेता. पण, शं.बां.च्या मनात प्रश्न उत्पन्न झाला, की गोदा ते कृष्णा-भीमापर्यंत असणारी कन्नड भाषा गेली कुठे? या भाषा जाणे-येणे घडण्याच्या प्रकारामागील सूत्र नियम किंवा शास्त्र कोणते? घरची भाषा मराठी, त्यामुळे मराठीचा जन्म व या संस्कृतीचा उदय हे माहीत असणे जरूर नाही काय? याहूनही महत्त्वाचा श्री विवेकानंद, टागोर वगैरे वाचताना मनात येणारा प्रश्न : आर्यद्रविड मिश्रण, संमिश्र संस्कृती, वैदिक संस्कृतीतून हिंदू संस्कृती जन्म पावली, म्हणजे काय? ज्या भारताच्या स्वातंत्र्याकरिता एवढी चळवळ चालली आहे, त्या भारतीय संस्कृतीचा गाभा कोणता आणि आमची संस्कृती थोर, सनातन म्हणतो, तर आजची दैन्यावस्था का आली? चुकले कोठे? आजही ही संस्कृती थोर असल्याचा दावा श्री.अरविंद घोष त्या वेळी 'Defence of Indian Culture' या आपल्या 'आर्य' मासिकाच्या अंकातून करीत होते. पण मुळात संस्कृती म्हणतात, ती काय वस्तू आहे? धर्म आणि संस्कृतीत फरक काय? वगैरे वगैरे.

लोकमान्य आणि गांधीजींच्या काळी अखिल भारतीय चळवळीत शं.बा.-आधी ओढले गेले. पण पुढे ज.स.करंदीकर, वैद्य,प्रभृतींच्या बृहन्महाराष्ट्र चळवळीने भाषिक द्वैत उफाळून आले. भारतीय संस्कृती, भारतीय समाज ही एकात्मकतेची प्रतीके विरून जाऊ लागली. कर्नाटक-आंध्र-महाराष्ट्र अशा प्रांतीय तेढींच्या ओढीत भारतीय संस्कृतीचा खरा अर्थ काय, हे जाणण्याची तीव्र उत्कंठा निर्माण झाली. द्राविड आर्य द्वैत, ब्राह्मण ब्राह्मणेतर रूपात प्रकट झाले. म्हणून हे द्राविड काय प्रकरण आहे, हा प्रश्न त्यांच्यापुढे आधी आला. आणि या आर्यद्राविड समस्येस कर्णाट-मऱ्हाट संबंधाच्या व्यासंगात काही उत्तर मिळण्याची शक्यता दिसू लागली. त्यातूनच शं.बां.ना मराठी भाषा व संस्कृतीचा उद्गम व विकास जाणण्याची आवश्यकता वाटू लागली.

वेदकालीन भाषेत तथाकथित द्राविड शब्द आहेत, हे विधान खरे मानल्यास आर्य भाषा वर्गातील मराठीतही त्या शब्दांचा व संस्कृतीचा अंश असणे क्रमप्राप्तच आहे. या भूमिकेतून आणि मराठी व कानडी या दोन्ही भाषा अवगत असल्याने 'मऱ्हाटी संस्कृती' हे पुस्तक लिहिणे त्यांना आपले कर्तव्य वाटले. शिवाय त्यांना भारतीय संस्कृतीचा विचार, अभ्यास करण्यासाठी मराठी संस्कृतिविषयक निर्णायक मत हवे होते. त्याकरिताही या ग्रंथाचे लेखन करणे शं.बां. ना आवश्यक वाटले. १९३४ साली 'महाराष्ट्र द मूल' अथवा 'मूल महाराष्ट्र' हे शं.बां.चे कन्नड भाषेतील पुस्तक प्रसिद्ध झाले. त्या वेळी कर्नाटक कॉलेजातील त्याचप्रमाणे इतरही काही मराठी मंडळींनी महाराष्ट्रात शं.बा म्हणजे 'मराठी




अनुक्रमणिका

द्वेषी चित्पावन', अशा कंड्या पिकवल्या. इथूनच शं.बां.ना विरोधाची चुणूक जाणवली.

अशा एका संधिकाली आचार्य भागवतांची व शं.बां.ची आकस्मिक ओळख झाली. आचार्य स.ज.भागवत. १९४०-४७ च्या दरम्यान धारवाड-हुबळीस हवापालटा-करिता येत असत. वरचेवर येत असत. हुबळीस त्यांचे बंधू होते. तिकडे गेल्यावर त्या भागातील विचारवंतांचा व साहित्याचा परिचय करून घेण्याची त्यांची प्रथा होती. दोन्ही भाषिक संबंधाबद्दल जाणून घेण्याचा प्रयत्न होता. एका सभेतील त्यांच्या भाषणानंतरच्या परिचयात शं.बां.चे नाव ऐकताच आचार्य भागवत एकदम गंभीर झाले. व त्यांनी त्यांच्या लेखनविषयाबद्दल प्रश्न केला आणि 'तुमचे विचार जाणण्याची उत्सुकता आहे. उद्या प्रा. अकोळकराकडे मी आहे, तिथे याल का' असे त्यांनी विचारले. त्याचपमाणे शं.बा. दुसऱ्या दिवशी आचार्यांना भेटण्यासाठी गेले. थोडी प्रश्नोत्तरे झाली, शेवटी त्यांनी विचारले, ' तुमचे विचार मराठीत साधार मांडण्याची तुमची तयारी आहे का?' 'महाराष्ट्र द मूल', प्रसिद्ध होताच शं.बा. पुण्यास तेथील विद्वानांची मते अजमावण्यास गेले. त्या वेळी त्यांचा व ग.ह.खरे यांचा परिचय व स्नेह झाला, त्यांनी एक चर्चा घडवून आणली. श्री.द.वि. आपटे अध्यक्ष होते. आपटे हे जमखंडीजवळील हत्तगडीचे. ते दोन्ही भाषा जाणत. या चर्चेला ज.स. करंदीकर उपस्थित होते. ते धारवाड जवळील कुंदगोळचे. ते कानडी जाणत व बोलत. आणखी वीस-पंचवीस विद्वान आले होते. या सर्वांमुळे विचारविनिमयास कळा आली. शं.बा. सांगत असलेला कानडी भाषिक पुरावा काल्पनिक नव्हे, याचे ते साक्षी होते. पुढे ग.हं. खरे यांनी 'केसरी' मध्ये या चर्चेचा गोशवारा देण्यास मदत केली. शं.बां.चा मराठीत लिहिण्याचा व लेख प्रसिद्ध होण्याचा तो पहिलाच योग. श्री.शं.रा.दाते यांनी महाराष्ट्र शब्दकोषात त्यातील काही मजकूर दिला आहे. शं.बां.नी त्या वेळी श्री.दाते यांच्याशीही चर्चा केली. त्यांना कानडी प्रभावाची जाणीव होती.

आचार्य भागवतांनी शं.बा.ना ग्रंथ लिहून दिल्यास छापण्याचे आश्वासन दिले (१९४५); पण चळवळीच्या काळात त्यांना बऱ्याच दिवसांत ते शक्य झाले नाही व शं.बां.नाही मराठीत ग्रंथरूपाने लिहिण्याचा विश्वास नव्हता. पुढे देव, जावडेकर आणि भागवत यांनी 'नवभारत' मासिकाची योजना प्रत्यक्षात आणली. यात प्रथम काही लेख लिहून प्रतिक्रिया अजमावाव्यात, असे ठरले. 'ग्रामनामे व समाजेतिहास' हा लेख प्रथम आला. डॉ. इरावतीबाई कर्वे व शं.बा. या दोघांनी मिळून त्यांच्या सर्वेक्षणासाठी मैसूर कूर्ग प्रांतात प्रवास केला. त्या वेळी त्यांना इकडील स्थलनामात मराठी दिसत होते. 'श्रवण - बेळगोळपर्यंत जर मराठी, तर कर्वेबाईंना दिसणारे मराठी खोटे कसे?' या उलट शं.बां.ना महाराष्ट्रात स्थलनामात कानडी दिसत होते. नृपतुंगकालीन (८१०) ग्रंथात 'गोदावरि वरं इर्द कंनड जनपदं' हा निर्देश म्हणजे शं.बां.चा आधार! ते दोघेही खूप कडाक्याची चर्चा करीत. (१९४९) याचा निष्कर्ष पाहण्याकरिताच स्थलनामावर शं.बां.नी प्रथम लेख लिहिला.

डॉ. इरावतीबाईंनी त्या लेखास उद्देशून 'नवभारतात काही लिहावे, असे शं.बां.ना

वाटत होते. पण त्यांनी आपले सहकारी सांकलिया यांच्यावर भार घातला. पण दोघेही चालढकल करू लागले. तेव्हा ही ग्रामनामे संस्कृत नव्हेत, तर तथाकथित द्राविड हा स्थलनामांचा विचार डॉ.कत्रे यांना पुढे करून खोडून काढवावा, असा त्यांनी खूप पयत्न केला. पुढे त्यांनी शं.बा. व कत्रे यांची चर्चा घडविली. त्या वेळी अद्यापि टी.बरोचा ''द्राविड मूलकोष'', प्रसिद्ध झाला नव्हता. पट्टि, पाडी, पट्टण, पाटण या स्थलनमांचा निर्देश त्यांनी द्राविड म्हणूनच केला आहे. डॉ.कत्रे यांना शंबानी पट्टि, पाडी हे संस्कृत नव्हे, असे आपले मत सांगितले. हे शब्द संस्कृत वर्गातले (इंडो यूरोपीय) वाटत नाहीत. असे डॉ.कत्रे यांनी सांगताच बाई स्तब्ध झाल्या; पण वाडी, वाट बद्दल त्यांनी उभयान्वयी मत दिले.

कर्नाटकात दोन प्रकारचे आक्षेपक होते १) शं.बा. जोशी विरोधी २)मराठीचा गंध नसलेल्या मैसूरकडील काही विद्वानांना 'गोदावरी वरं' हा उल्लेख अतिशयोक्तीचा वाटे. कळमरेयाद कन्नड (१९३३) व 'महाराष्ट्र द मूल', (१९३४) ही पुस्तके प्रसिद्ध होताच मैसूरकडील बऱ्याच विद्वानांना आश्चर्याचा धक्का बसला. शं.बां.नी चौखाळलेला संशोधनाचा हा स्वतंत्र मार्ग न खपल्याने काही मराठी जाणणाऱ्या कन्नड विद्वानांनी त्यांच्या विरोधात आघाडी उघडली

'नवभारता'तील लेख खोडले जातील, अशी एक अपेक्षा होती. पण ती व्यर्थ ठरल्याने आचार्य भागवतांनी ते लेख त्याच सुमारास स्थापन झालेल्या 'आंतरभारती' संस्थेतर्फे 'आंतरभारती' प्रकाशनाचा प्रारंभीचा ग्रंथ म्हणून प्रसिद्ध करण्याचे ठरवले. शं.बां.नी संस्कृततज्ज्ञांच्या विशेष मार्गदर्शनासाठी डॉ.रा.ना दांडेकर यांची भेट घेतली. त्यांनी संपूर्ण हस्तलिखित वाचून उपयुक्त सूचना केल्या व ग्रंथ प्रसिद्ध करून व टीका घेण्यास हरकत नाही, Hypothesis खरा,खोटा हे अशाच मार्गाने ठरवावयाचे असते, असे आपले मत दिले. श्री.ना.ग गोरे तर म्हणाले की, 'तुम्ही टीका घेण्यास तयार होऊन मराठी सांस्कृतिक समस्या धसास लावण्यास मदत करीत आहात. हे पुस्तक छापलेच पाहिजे, पण महाराष्ट्रात कट्टर वर्गाचा विरोध होणार, याविषयी कोणासच शंका नव्हती.

आचार्यांना आश्चर्य वाटले ते कर्नाटकातील एका बुजुर्ग साहित्यिकाने पुण्यास येऊन 'हे पुस्तक न छापावे' अशी सूचना केल्याचे! असो. पुस्तक छापले गेले. त्या वेळी प्रा. वसंत बापट धारवाडात होते. त्यांचा आणि शं.बां.चा ऋणानुबंध निर्माण झाला होता. बापटांनीच शं.बां.च्या भाषेचे वळण मराठीच्या जवळ आणण्यास मदत केली होती. त्या वेळी मुंबईहून प्रुफे येत असत. ती तपासत असताना बापट 'मराठी माणूस -विद्वान तुमचे वाभाडे काढणार हे नक्की' असे म्हणत असत. त्या वेळी शं.बा म्हणत, 'मी कोणत्याही हट्टाने हे छापीत नाही, तर मी मांडलेले विचार कोते असतील, पण नीराधार आहेत, असे दाखवाल, पुरावा शोधाल, तर ते मला हवेच आहे. मराठी भावनेस धक्का पोचतो, हे तुम्हांला मी स्वतःच्या अनुभवानेच सांगतो. कारण माझी घरची भाषा मराठीच आहे. तरी वास्तव, सत्य म्हणून

काही चीज़ आहे, असे मानणे, श्रद्धा ठेवून जगणे जरूर असेल, तर या संकुचित भावना दूर करणे आवश्यक नाही काय?' अशी चर्चा चालत असे.

हे पुस्तक डिसेंबर १९५२ मध्ये मुंबईत प्रसिद्ध झाले. त्या वेळी आंतरभारतीचा प्रेस व कार्यालय तेथेच होते. ते पुढे पुण्याला गेले. मुंबईत पुस्तक प्रकाशन समारंभ झाला. अध्यक्षस्थानी म.म.द.वा पोतदार होते. श्री.पु.भागवत, ह.रा.महाजनी हेही उपस्थित होते. म.म.द.वा.पोतदारांचे भाषण झाले. आचार्य भागवतांनी ग्रंथाच्या प्रस्तावनेत म्हटले होते, 'महाराष्ट्र व कर्नाटक यांचे भाषिक व सांस्कृतिक संबंध इतके संमिश्र आहेत, की या दोन्ही भाषांतील विद्वानांनी व संशोधकांनी परस्पर भाषांचा अभ्यास केल्याशिवाय कोणताच प्रश्न निर्णायकरीत्या सुटेल, असे मला वाटत नाही. एका अर्थाने कर्नाटक व महाराष्ट्र यांतील संबंध उलगडावयाचा, म्हणजे आर्य-द्राविड संबंधाचा उलगडा करण्यासारखे अहे. द्राविड संस्कृतीचे मूल स्वरूप काय, तिचा आर्यांच्यावर कोणता परिणाम झाला व आर्यद्राविडांत झालेली देवघेव कोणत्या स्वरूपाची होती. हा साराच विषय अद्यापि अनिर्णीत स्थितीत आहे. संशोधकांमध्ये विविध तर्क चालू आहेत. 'मोहेंजोदारो'च्या संस्कृतीचे स्वरूप अद्यापि निश्चित झाले नाही. त्यामुळे या क्षेत्रातील कोणाच्याही लेखनास संपूर्ण मान्यता मिळणे स्वभावतःच कठीण आहे. श्री.शं.बा जोशींनी आर्य द्रविड समस्येचा उलगडा करण्यासाठी कित्येक वर्षे चिंतन चालवले आहे. त्यांच्या जवळ अशा संशोधनास लागणारी प्रतिभाशक्ती फार मोठ्या प्रमाणात आहे. बारीक बारीक पुराव्यांचे दुवे गोळा करण्यास त्यांनी वर्षानुवर्षे कष्ट घेतले आहेत. प्रस्तुत ग्रंथात त्यांच्या दोन तपांचे फलित सामावलेले असल्याने सामाजिक संशोधनाची आवड असलेल्या अभ्यासू वाचकांना हा ग्रंथ अतिशय मनोरंजक व विचारप्रेरक भासल्याशिवाय राहणार नाही'', अध्यक्षीय भाषणात म.म.द.वा पोतदारांनी 'आमचा मतभेद आहे'. असे सांगितले. त्यानंतर शं.बां.नी त्यांना विनंती केली, की 'मरहट्ट- मऱ्हाट' याचे संस्कृतीकरण हेच 'महाराष्ट्र' झाल्याचे माझे म्हणणे नव्या पुराव्यासकट खोडून मला मदत करा. म्हाळसी, (माळची-माळव्वा) मैलार, मैराळ या देवता विदर्भ-उज्जयिनीपर्यंत कशा, याचा अर्थ विशद करा म्हणजे माझा विचार पूर्ण निराधार ठरेल,' म.म. म्हणाले, 'जोशीबुवा, तुमचे आव्हान मी स्वीकारतो. सहा महिन्यांत उत्तर मिळेल,' पुढे पुण्यास गेल्यावर दोनतीन प्रसंगी शं.बा.त्यांना भेटून मनःपूर्वक प्रगती विचारीत असत. पण फारसा प्रतिसाद न मिळाल्याने त्यांनी तो प्रयत्न सोडून दिला. शं.बां.नी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांना पुस्तक पाठवून त्यांचे मत विचारले. त्यांनी विरोध दर्शविला नाही; पण विचार होणे आवश्यक आहे, असे सांगितले. पुढे अहमदाबाद येथील साहित्यसंमेलनात श्री. वि.द.घाटे व दिल्लीतील साहित्य संमेलनात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी या दोघांनी आपापल्या अध्यक्षीय भाषणांत या पुस्तकाचा आवर्जून उल्लेख केला आहे. याचे शं.बां.ना त्या वेळी फार महत्त्व वाटले. कारण, विडंबक व तीव्र विरोधी प्रत्यक्ष टीका त्याचप्रमाणे निषेधसभा घेण्याची हालचाल या पार्श्वभूमीवर या अध्यक्षीय

भाषणातील सामान्य उल्लेखही शं.बां.ना समाधान, दिलासा देणारा ठरला.

पण आश्चर्य असे, की श्री.रा.टिकेकरांची विरोधी लेखमाला 'साधना'मध्ये प्रसिद्ध होऊ लागली. संपादक रावसाहेब पटवर्धन पुण्यात असत. त्यांना ही लेखमाला पाहून आश्चर्य वाटले. आचार्य भागवतांनीही रावसाहेबांजवळ 'आंतरभारती' च्या या प्रकाशनाचे विडंबन या आंतरभारतीच्या मुखपत्रातच होत असल्याबद्दल आपला क्षोभ व्यक्त केला. भागवतांनी हे पुस्तक त्यावरील मते कळवण्यासाठी निरनिराळ्या पातळीवरील विचारवंतांना विनंतिपूर्वक पाठवले. वृत्तपत्रे, मासिके, आकाशवाणीची दोन्ही केंद्रे, विनोबा, मिराशी, बनहट्टी, ना.गो चाफेकर, म.म काणे, दुर्गा भागवत, इरावती कर्वे वगैरे. टाइम्सने अनुकूल मत व्यक्त केले, विनोबाजींनीही या पुस्तकाचे स्वागत केले. 'नवभारता'ने मिराशींचा लेख मुद्दाम मागविला. न.र. फाटक आदी अनेकांच्या प्रतिक्रिया आणवल्या. त्यांत पुष्कळ अनुकूल मते आली. म.म.काणे यांनी 'मला ही भूमिकाच मान्य नाही,' असे मत व्यक्त केले होते. श्री वागभट ना.देशपांडे, ना.गो चाफेकर, श्री.ना. बनहट्टी यांची अनुकूल मते आली होती. 'केसरी'तील १९३५ च्या सुमारच्या वृत्तांताचा बराच उपयोग झाला होता. वामन मल्हार जोशी यांनी लिहिले होते, 'तुमचे कात्रण मिळाले, पण ते येण्यापूर्वीच 'केसरी'चा तो भाग काढून ठेवला आहे. हेतू एवढाच, की आपल्यात पूर्णतया नव्या रीतीने विचार करू शकणारे तरुण लेखक उगवू लागले आहेत. मला तुमच्या विषयात गम्य नाही, पण ते विचार सुसंगत व मनाची पकड घेणारे आहेत. ते साधार, निराधार ठरविण्याचा अधिकार माझा नव्हे. अभिनंदन.' (या ग्रंथावरील अनुकूल - प्रतिकूल प्रतिक्रियांचा सविस्तर परामर्श प्रस्तुत लेखकाने संपादित केलेल्या 'मऱ्हाटी संस्कृती', च्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत घेतला आहे.)

महाराष्ट्रातील प्रांजळ प्रतिक्रियांनी शं.बां.च्या व्यासंगांना दुप्पट जोर आला होता, उत्साह प्राप्त झाला होता. कर्णाटातील त्यांचे हितशत्रू त्यांच्याबद्दल गैरसमज पसरवण्याचा उद्योग करीतच होते. शं.बां.नी स्वीकारलेल्या भूमिकेमुळे शं.बां.ना दोन-तीन प्रकारच्या अडचणी स्वीकारणे भाग होते. १) त्यांना आपल्या संस्कृतीच्या जडणघडणीची वस्तुस्थिती काय आहे, हे जाणावयाचे होते. त्यांचे असे निश्चित स्वरूपाचे मत त्यांना नव्हते. गांधीयुगात सत्यावरील निष्ठेस महत्त्व होते. सत्य हाच देव होता. पण सत्य म्हणजे काय आणि देव म्हणजे काय? संशोधनात त्या वेळेपुरते तरी सप्रमाण जे ठरते, ते सत्य, असे ते धरून चालले होते. आणि सत्याहून श्रेष्ठ काही नाही, ही सांप्रदायिक धारणा होती. यामुळे शं.बां.ना या कानडीशी तादात्म्य पावण्यास बिलकुल अडचण पडली नाही. पण 'मराठीचा द्वेष' करणारा हा आरोप त्यांना कधीच सहन झाला नाही, तरी पण त्यांनी स्वीकारलेली भूमिका या आरोपास संशयास जागा देणारी होती. 'मऱ्हाटी संस्कृती' ची १ली आवृत्ती धनंजयराव गाडगीळांना अर्पण केली होती. त्यांचा आणि शं.बां.चा लहानपणापासूनचा परिचय होता आणि एक थोर, साक्षेपी, तर्कशुद्ध विचार करणारी व्यक्ती म्हणून शं.बां. नी

त्यांच्या कन्नड मराठी सांस्कृतिक संबंधांच्या व्यासंगात त्यांना त्यांचे conscience-keeper 'तोल पाहणारे' म्हणून मानले होते. ते मराठीचे अभिमानी, पण प्रमाणांना मान देणे कर्तव्य मानणारे म्हणून शं.बा. वेळोवेळी त्यांना भेटून आपली भूमिका त्यांच्याकडून तपासून घेत असत (१९३२-४०) अशाच प्रसंगी डॉ. इरावतीबाईंच्या परिचयाचा योग आला. त्यांनी विरोधी भूमिका चेवाने पत्करली. ते पाहून शं.बांचाही उत्साह वाढला. धनंजयरावही शं.बां.च्या प्रमाणांना काही वेळा विरोध करीत, पण त्या विरोधात ईर्ष्या नसे. संशोधन-पद्धती शास्त्रीय पाहिजे, ही आपली भूमिका ते सतत मांडीत. पण शं.बां.ना भाषा शास्त्राच्या व पारंपरिक चालिरीतींच्या अभ्यासातील काही मूलभूत सूत्रे पक्की माहीत असल्याने श्री. गाडगीळांच्या स्वरूपाची शास्त्रीय पद्धती त्यांना कधीच इष्ट वाटली नाही. तथापि, एवढा थोर विचारवंत सांगतो, आक्षेप घेतो, तर ही शास्त्रीय पद्धती म्हणजे काय चीज आहे, याची जिज्ञासा शं.बां च्या मनात उत्पन्न झाली व १९३८-३९ पासून त्यावरील ग्रंथ ते वाचीत राहिले. तरीही स्वतःला जे पटले, ते बेफिकीरपणे सांगण्याचा उद्योग त्यांनी चालूच ठेवला होता.

२) या अभ्यासात आपल्या सनातन धार्मिक समजुती बऱ्याच पोकळ असल्याचे त्यांना आढळले. यामुळे संप्रदायाभिमानी वर्ग नाराज झाला. हे त्यांच्या हितशत्रूंना बरे वाटून ते त्याचा फायदा घेऊ लागले. पण शं.बां. नी आपली भूमिका सोडली नाही.

३) शं.बां. ची तिसरी अडचण-त्यांनी विश्वविद्यालयीन शिक्षण घेतले नव्हते. पदव्या मिळविल्या नव्हत्या. प्राथमिक शिक्षक तो काय आणि त्याचे संशोधन ते काय, हा एकच प्रश्न त्या काळात कर्नाटक - महाराष्ट्रात शंका किंवा अविश्वास निर्माण होण्यास पुरेसा होता. (याच शं.बां.ना यांच्या कन्नड साहित्य सेवेबद्दल १९७१ मध्ये म्हैसूर विश्वविद्यालयाते डि. लिट ही पदवी दिली. ते कन्नड साहित्य संमेलनाचे अध्यक्ष झाले. त्यांना साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला. त्यांच्या नावाने हम्पी विद्यापीठात अध्यासन निर्माण करण्यात आले. महाराष्ट्रातील विद्वानांनी व्यक्त केलेली मते शं.बा. आपल्या कन्नड पुस्तकात मुद्दाम देत असत. कर्नाटकात कीर्ती मिळवण्यासाठी हा गृहस्थ हे लेखन करीत आहे, महाराष्ट्र कर्नाट संबंधांचे विचार मराठीत आले, तर प्रक्षोभ निर्माण होईल, असे म्हटले जाई. शं.बां ची प्रस्थापित सिद्धांत उद्ध्वस्त करणारी विचारसरणी अनेकांना प्रक्षुब्ध करीतही असे. १९३९ मध्ये 'शिवरहस्य' हे त्यांचे पुस्तक प्रसिद्ध झाले. त्या वेळी काही कट्टर तरुण लिंगायत चिडले आणि शं.बा. बेल्लारीला व्याख्यानासाठी गेले असता, त्यांना मारण्याचाही प्रयत्न झाला; पण लिंगायतांमध्येच शं.बां. चा अभिमान बाळगणारे त्यांचे पक्षपाती बनलेले अनोळखी असे बरेच लोक होते. त्यांनी या तरुणांना आवरले.

महाराष्ट्रात शं.बां ची मते अनेकांना मान्य नसली, तरी त्यांचा प्रतिवाद बौद्धिक चर्चात्मक पातळीवर सुरू होता. स्थलनामे, धर्मपंथ, दैवत विचार, कुमार व्यास आणि मुक्तेश्वर यांविषयीच्या त्यांच्या संशोधनास पुढील काळात बरीचशी अनुकूलता निर्माण

झाली. त्यात उपर्युक्त विद्वानांचाही समावेश होतो. डॉ.अ.ना देशपांडे यांनी आपल्या 'प्राचीन मराठी वाङ्‌मयाचा इतिहास' खंड१ मध्ये शं.बां. ची बव्हंश मते मान्य केली आहेत आणि शं.बां.ना त्यांचा मोठा आनंद वाटला होता. वेदवाङ्‌मयाच्या सखोल व्यासंगातून आधुनिक जीवनातील अनेकविध समस्यांचा वेध शं.बां.नी त्यांच्या कन्नडमधील साहित्यात घेतला. 'मऱ्हाटी संस्कृती : काही समस्या' या त्यांच्या मराठी ग्रंथातही त्यांच्या अपूर्व निर्माणक्षम प्रतिभेचे दर्शन घडते.

**१७३० ई, सहावी गल्ली, राजारामपुरी, कोल्हापूर ४१६००८.**

**शं.बां.च्या जीवनातील काही महत्वपूर्ण घटना**

४-१-९६ जन्म. गुर्लहोसूर येथे (जिल्हा -बेळगाव)

१९१९- कानडी ट्रेनिंग कॉलेज धारवाड येथून-प्राथमिक शिक्षक (प्रथमश्रेणी)

१९१९- लेखनास सुरुवात (काही अवांतर लेखन)

१९२०- इंग्लिश भाषेचा अभ्यास स्वतःच सुरू केला.

१९२०- वर्तमानपत्रे, साप्ताहिके व मासिकांत लेखन सुरू

१९२१- महर्षी अरविंदांचे चरित्र

१९३३- 'कण्णमरेयान्द कन्नड' प्रथम संशोधन ग्रंथ

१९३८- हावेरी येथे भरलेल्या ३ऱ्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष

१९४६- उत्तर कन्नड जिल्हा २ऱ्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष

१९७०- 'कर्नाटक संस्कृतिय पूर्व पीठीके' ह्या पुस्तकास केंद्र साहित्य अकादमीचा पुरस्कार

१९७१-मैसूर विश्वविद्यालयाने डॉक्टरेट दिली.

१९७९- धर्मस्थळ येथे भरलेल्या सर्वधर्म साहित्य संमेलनाचे अध्यक्ष

१९८१-मडिकेरी येथे भरलेल्या ५४व्या अखिल भारतीय कन्नड साहित्य संमेलनाचे अध्यक्ष

१९८१-बेंगळूर येथे सार्वजनिक सत्कार व 'अध्ययन' हा ग्रंथ प्रदान.

१९८५-डॉ. शिवराम कारंथ यांचे हस्ते. 'समाज पुस्तकालया'च्या सुवर्णमहोत्सव प्रसंगी सत्कार

१९८६-कर्नाटक राज्योत्सव प्रशस्ती (सुवर्णपदक)

१९८७-डॉ.शिवराम कारंथ यांच्या अध्यक्षतेखाली शिवमोगा कर्नाटक संधाने प्रशस्तिपत्र देऊन सन्मान केला.

१९९०- कर्नाटक राज्य सरकारने त्यांच्या जीवनावर एक साक्षीचित्र (Documentary) काढली

२८-९-१९९१-मृत्यू

**शं. बां. ची पुस्तके**

१) महर्षी अरविंद घोष यांचे चरित्र

२) उपनिषद् रहस्थ (अनुवाद)

३) लोकमान्य कथामृत सार

४) कण्णमरेयाद कन्नड

५) महाराष्ट्र द मूल

६) कर्नाटक वीर क्षत्रियरु १९३६. देवराज वडियेर प्राईज

७) कंनुडिय हुडु १९३६. देवराज वडियेर प्राईज तसेच मुंबई सरकारचे प्रकाशनास धनसाहाय्य

८) कर्नाटक संस्कृतिय पूर्व पीठिके (भाग १)

९) कन्नड द नेले

१०) शिवरहस्या. अथवा वेददल्ली काणुव वीरशैव मत्र द बेरुगळू

११) रूढी हागू भाविक कल्पनेगळू

१२) एंद्देलु कन्नडिगा

१३) अग्निविधे

१४) कर्णन मूरु चित्रगळू

१५) एडेगळ हे कुव 'कंनाडकथे'

१६) यक्षप्रश्नी अवि बरलिरुव समाज

१७) समाजदर्शन

१८) सौंदर्यविचारा

१९) कंनुडिय जीवाळा

२०) दारिय बुत्ती

२१) हालु मत दर्शन

२२) मक्कळ वडपुगळू

२३) कर्नाटक संस्कृतिय पूर्वपीठिके (भाग २)

२४) ऋग्वेदसार नागप्रतिमा विचार ०- (हा ग्रंथ मैसूर विश्वविद्यालयाने प्रकाशित केला व त्यास Hon. D. Litt दिली)

२५) भाषे मत्तु संस्कृती

२६) सत् - त्व - सत्य.

२७) कन्नड साहित्या : अभिवृद्धी

२८) प्रवाह पतितर कर्मा : एंब धर्मा

२९) भगवद्गीतेयोळ गिन्न राजयोगा

३०) सांस्कृतिक मुळदल्ली तात्त्विक चिंतनेगळू

३५) मानव धर्मद आकृती





अनुक्रमणिका

३२) बुधन जातका
३३) मऱ्हाटी संस्कृती (मराठी)
३४) सनातन धर्मा
३५) बित्तिदन्तु बेळकू
३६) जीवन द अर्थग्रहण पद्धती
३७) मऱ्हाटी संस्कृती (कानडीत भाषांतर)
३८) श्रीमत् भगवद्गीता (सातवळेकर भाषांतर)

**'मानवधर्म प्रतिष्ठान'**

आज मनुष्य हा मतमतांतरात ओढला गेल्याने, त्याला मानव धर्माचा विसर पडला आहे. असे शं.बां. यांचे मत होते. पंथ सोडून प्रज्ञेला अनुसरून व आपल्या अंतःप्रेरणेनुसार मानवधर्म समजून त्याचे पालन केले पाहिजे, असे ते आपल्या लेखनात प्रतिपादतात.

भारतीय परंपरेतील प्रकाशतत्त्व हे सांकेतिक वैवस्वत मनुप्रणीत मानवधर्म प्रेरक शक्ती होय. परंतु आज ह्या मनूला स्थानभ्रष्ट करून भारतीय हे चंद्राचे उपासक झाले आहेत. मोक्षासाठी आपली मते बदलून प्रकाशतत्त्व विसरले आहेत.

म्हणून त्यांनी मानवधर्म प्रतिष्ठान स्थापले.

**शंबा विचार वेदिके?**

नावाची एक संस्था बंगलोर येथील शं.बा जोशी यांच्या चाहत्यांनी स्थापन केली आहे. श्री.शिवलिंगय्या हे या संस्थेचे कार्यदर्शी आहेत. शं.बां.च्या निधनानंतर या संस्थेतर्फे एक वर्षभर दर दोन महिन्यांनी एक अशी सहा चर्चासत्रे आयोजित करण्यात आली होती. शं.बां.च्या १ल्या पुण्यतिथीस त्यातील निबंध 'शंबाकृतीसमिक्षे' या नावाने ग्रंथरूपात प्रसिद्ध करण्यात आले. त्यानंतर आणखी दोन पुस्तके प्रसिद्ध करण्यात आली. त्यानंतर आणखी दोन पुस्तके प्रसिद्ध झाली.

१) 'संस्कृती मत्तु शंबा' २) 'पातळी' हा ग्रंथ म्हणजे त्यांच्या ग्रंथावर विविध नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या समीक्षालेखांचा संग्रह आहे. 'शंबांच्या आठवणी' म्हणून एक चवथे पुस्तक लवकरच प्रसिद्ध होत आहे.



---

## नृत्यविन्मुख - ग्रंथविन्मुख

अधिकांश मराठी समाज नृत्यविन्मुख आहे तसाच तो ग्रंथविन्मुखही आहे. नृत्यविन्मुखतेमुळे त्याने जीवनातली लय आणि बेहोषी गमावली आहे. ग्रंथविन्मुखतेमुळे त्याने जीवनातली अंतर्मुखता आणि संवेदनक्षमता गमावली आहे. हे बदलायला हवे आहे.

**द. भि. कुलकर्णी**

# लेखन

विस्टन ह्यू ऑडन
अनुवादक : नीलिमा गुंडी

(ऑडन (१९०७-१९७३) हा एलियट नंतरच्या पिढीचा एक महत्त्वाचा कवी. १९३९ मध्ये त्याने इंग्लंडमधून अमेरिकेत स्थलांतर केले. १९३२ मध्ये त्याने मुख्यतः शाळकरी मुलामुलींसाठी 'रायटिंग' हा लेख लिहिला. वाङ्मयीन संस्कृतीची ओळख करून देण्याचा हा प्रयत्न आज ही लक्षणीय वाटावा.)

**बोलणे :**

जर एखादा ऑस्ट्रेलियन आदिवासी एखाद्या टाचणीवर नकळत बसला, तर तो 'आउ' म्हणेल. तोंडात हाडूक असलेल्या कुत्र्यासमोर दुसरा एखादा कुत्रा आला, तर तो गुरगुरेल. इंग्लिश, रशियन, ब्राझिलियन किंवा कोणत्याही देशातील माता तान्ह्या बाळांना थोपटताना गुणगुणतील. कोणत्याही बंदरावरील खलाशी जहाजाचा दोर ओढताना काय करतात, ते पाहा आणि ऐका- वजन खेचताना एकत्रितरीत्या ते 'हीऽ या' असे म्हणतील!

हीच तर पहिली भाषा असते!

'वस्तू दर्शविण्यासाठी वापरलेले शब्द म्हणजे भाषा' 'हे म्हणजे अमुक आणि ते म्हणजे तमुक' सांगणारी भाषा अशी आपली भाषेविषयीची साधारणतः समजून असते. पण भाषेचा सुरुवातीचा उपयोग हा नव्हता. बोलणाऱ्याच्या भावना व्यक्त करण्यासाठी भाषा वापरली जात असे. बोलणाऱ्याच्या संदर्भात घडलेल्या एखाद्या गोष्टीमुळे त्याला जाणवलेल्या भावना (जसे टाचणी टोचल्यानंतरची कळ) भाषेतून व्यक्त होत. तसेच, जगातील इतर गोष्टींविषयीचा त्याचा कल भाषेतून कळे. (भुकेलेला दुसरा कुत्रा किंवा लाडक्या बाळाविषयीचे उद्‌गार) किंवा आपल्याबरोबर काम करणाऱ्यांना मदत करण्यासाठीही भाषा धावून येई. (जसे वजन खेचतानाचा घोष.) पहिले दोन उपयोग अनेक प्राण्यांमध्येही सारखेच आढळतात. पण शेवटचा उपयोग मात्र वैशिष्ट्यपूर्ण असून, अंतिशय सुसंघटितपणे जगणाऱ्यांमध्येच तो आढळतो; आणि त्यात विकासाच्या शक्यताही सामावलेल्या असतात.

जीवन म्हणजे अनेक लहान लहान गोष्टींतून आकाराला येणारे एक समावेशक पूर्ण रूप असते. त्यातील प्रत्येक लहान घटक पुन्हा त्याहून लहान घटकांचा घडलेला असतो.

ज्याच्याविषयी बोलता येईल, अशी सर्वांत मोठी गोष्ट म्हणजे विश्व; आणि सर्वांत सूक्ष्म गोष्ट म्हणजे अणूतील ऋणभारित विद्युत्कण - अणूच्या गाभ्याशी असलेल्या धनभारित विद्युत्कणांभोवती गटाने फिरणारे! आपल्याबाबतीतही असेच आहे. पेशीकेंद्र आणि पेशी, पेशी आणि अवयव, अवयव आणि व्यक्ती, व्यक्ती आणि कुटुंब, देश,जग - असे आपल्याहून मोठ्या दुसऱ्या गटाशी निगडित असलेले गट. ते एका बाजूने स्वयंपूर्ण, इतरांपेक्षा वेगळे असतात. पण इतरांशी असलेले नाते लक्षात घेतले नाही, तर अर्थ हरवून बसतात. अनेक लहान घटकांशिवाय एक मोठा समावेशक पूर्ण घटक अस्तित्वात येऊ शकत नाही आणि पूर्ण अशा मोठ्या घटकाशिवाय लहान घटक अस्तित्वात राहू शकत नाहीत. एक पूर्ण मोंठा घटक म्हणजे लहान घटकांची केवळ बेरीज नसते. ती एक नवीच वस्तू असते.

पण समजा, भाग असलेला घटङ स्वतःला 'पूर्ण अशा मोठ्या घटकाचा भाग' असे न समजून 'आपल्याहून मोठे असे काही नाहीच', असे समजून - काम करू लागला तर.... काम ठप्प होईल! (शरीरात कॅन्सरचा प्रादुर्भाव होतो, तो अशा प्रकारेच.) आपल्याबाबतीतही हेच घडलेले आहे. मानवी इतिहासात कधीकाळी - कधी आणि कशी, कोण जाणे, माणसाला 'स्वतः'ची जाणीव झाली. त्याला 'मी' म्हणजे 'मी' स्वतः' आणि 'तू' म्हणजे 'मी नव्हे' हे जाणवू लागले. तेव्हापासून आपण स्वतःला आपल्यामध्ये बंदिस्त करून टाकले. आणि इतर अनेकांपासून तोडून टाकले. आता पूर्ण एकत्व उरले, ते म्हणजे फक्त 'मीपण'!

ही जाणीव जितकी वाढली, तितक्या प्रमाणात ही दरी सांधणारा पूल माणसाला हवासा वाटू लागला. शरीरातील पेशी जशा त्याच्या अंगभूत घटक असतात, तसेच, तोही समग्र जीवनाचा अंगभूत घटक आहे- ही अस्तित्वाची जाणीव नव्याने डोके वर काढू लागली. ही जाणीव हरपण्यापूर्वी तो गटामध्ये राहून शिकारीसारखी कामे पार पाडतच होता. तेव्हा ज्या वेळी सावज पहिल्यांदा नजरेस पडत असे अशा प्रसंगी त्याच्या भावना तीव्र होत आणि मग तो जमाव आरडाओरडा करीत असे, चित्रविचित्र आवाज काढीत असे, विकट हावभाव करीत असे! आवाज आणि त्याने गमावलेली तीव्र भावना दोन्ही गोष्टी एकदमच नष्ट झाल्या. त्यामुळे आपण आवाज केला, तर आवाजाबरोबर ती भावनाही आपण पुन्हा अनुभवू शकणार नाही का? अशा काहीशा विचारप्रक्रियेतून भाषा जन्माला आली. तिच्या विकासाची गती मात्र संथ असली पाहिजे. रानटी टोळ्यांमध्ये एखादी बातमी निरोप्याच्या करवी आपण कळवू, त्याहून वेगाने पोहोचते. त्यांच्या त्या पद्धतीविषयीच्या अज्ञानामुळे आणि ती पद्धत आपण प्रचारात आणू शकत नसल्यामुळे तिचा आधार जो सह-अनुभूती तिला आपण अज्ञानापोटी 'टेलिपथी' म्हणतो. मेलोनेशियामधील मूळ रहिवासी वल्हवायची होडी कशी चालवत, याची डॉ.रिव्हर्ज गोष्ट सांगतात. ती अशी : त्यांच्यांत कोणी वल्हे मारायचे आणि कोणी सुकाणू पकडायचे, याविषयी काहीही चर्चा होत नसे!

सर्वजण जणू उपजत प्रवृत्त्यनुसार आपापली जागा घेत.

आपल्यामध्येही दोन परक्या व्यक्तींपेक्षा दोन मित्रांना एकमेकांचे म्हणणे समजून घेताना फार कमी बोलावे लागते. त्यांचे संभाषण तिऱ्हाइताला कधीकधी कळण्याजोगे नसते. आपण जेव्हा दुसऱ्याचे म्हणणे ऐकत असतो, तेव्हाही त्याच्या म्हणण्याचा आशय फक्त शब्दांतून कळत नसतो; तर त्याचे हावभाव (डोळे बंद करून ऐकून पाहा!), तसेच तो आपल्याशी किती व्यक्तिगत जवळकीने बोलतो; यालाही महत्त्व येते. (उपाहारगृहामध्ये दुसऱ्या टेबलाजवळील मंडळी आपसात काय बोलत आहेत; हे बाजूला बसलो असताना जाणून घेणे आपल्याला अवघड जाते.)

शब्द, बोलणारा आणि ऐकणारा यांच्यांतील पूल ठरतात. बोलणारा जे सांगतो आणि ऐकणारा जे ग्रहण करतो, ते या पुलावरून आणलेले असते, यालाच आपण 'शब्दांचा अर्थ' असे म्हणतो.

**अर्थ :**

आपण जे काही म्हणतो, त्याला वेगवेगळ्या चार प्रकारचे अर्थ असतात. कुठे त्यातील एक अर्थ इतर तिघांहून अधिक महत्त्वाचा असू शकेल, पण त्यात चौघांतील थोडेतरी साधारणतः उपस्थित असतेच.

**१. आशय** (उदा., रेडिओवरून कळणाऱ्या रोख्यांच्या वाढलेल्या किमती) आपण कशाविषयी तरी काहीतरी बोलत तरी असतो किंवा कशाविषयी, काहीतरी कुणी बोलावे, याची अपेक्षा करीत असतो. जसे : 'स्निग हा एक माणूस आहे'. आता आपल्याला कळते, की स्निग नावाची गोष्ट आहे आणि ती म्हणजे एक माणूस आहे. कुत्रा वा दुसरे काहीही नाही.

**२. भावना** (उदा., प्रेमिकांचे संभाषण)

आपण ज्या गोष्टींविषयी बोलतो, त्या विषयी साधारणतः आपल्याला काही भावना असतात. 'तो स्निग म्हणजे एक भयंकर माणूस आहे.' आपल्याला यावरून कळते, की बोलणाऱ्याला स्निग काही आवडत नाही आहे.

**३. स्वरोच्चार (**काकू) (उदा., रात्रीच्या जेवणानंतरचे औपचारिक भाषण.) आपण ज्या व्यक्तीशी बोलत असतो, तिच्याविषयी आपली एक सर्वसाधारण दृष्टी असते. आपण एकच गोष्ट वेगवेगळ्या व्यक्तींना वेगवेगळ्या पद्धतीने सांगतो. 'तो स्निग म्हणजे अगदी सुव्वर आहे!' असे कुणाला सांगू, तर ''तो स्निग आहे ना! तो लोभस माणूस असेल देखील, पण खरं सांगायचं म्हणजे आपल्याला नाही बुवा तो आवडला!'' या शब्दात कुणाला सांगू!

**४. हेतू** (उदा., सार्वत्रिक निवडणुकीच्या वेळेचे भाषण.) आपण काय म्हणतो किंवा आपल्याला काय वाटते, यापेक्षा आपण अनेकदा श्रोत्यांना विशिष्ट पद्धतीने कृती अथवा विचार करायला प्रवृत्त करत असतो. 'तो स्निग आहे ना! तुझ्याजागी मी असतो ना, तर त्याच्याशी फारसा संबंध ठेवलाच नसता!' बोलणारा स्निगशी आपल्या होणाऱ्या भेटीगाठी थांबवायच्या प्रयत्नात आहे!

**भाषा आणि शब्द :**

आपल्याला माहीतच आहे, की भाषा ही काही शब्दांनी बनलेली असते. आणि हे शब्द काही मोजक्याच वर्णांचे बनलेले असतात. (इंग्रजीत हे वर्ण ४० ते ५० च्या दरम्यान आहेत.) आणि या वर्णांचे विशिष्ट क्रमाने गट केलेले असतात. यातील प्रत्येक वर्णसमूह हा एखादी वस्तू, कृती, रंग, कल्पना, इत्यादींचा वाचक असतो. भाषेच्या उगमाविषयीच्या आपल्या संक्षिप्त कथनाकडे आता परत वळू या. भाषेच्या अस्तित्वापूर्वीही काहीतरी भावना असलेले लोक (शिकारी जमाव) होते. भावना (भुकेपोटी म्हणा, भीतीपोटी म्हणा, एकत्रित येण्याची भावना), भावना चेतावणाऱ्या गोष्टी (शिकार केलेला गवा) आणि भावना व्यक्त करणारे ध्वनीही होते. भावना पुन्हा व्यक्त करण्यासाठी जर ध्वनी वापरला असेल, तर त्यातून त्या प्राण्याची प्रतिमा किंवा कल्पना म्हणा किंवा भावना चेतावणारे जे काही असेल, ते म्हणा-आठवू लागले असेल. अशा प्रकारे ध्वनींतून आशय व्यक्त होण्यास-वस्तू सुचवल्या जाण्यास-सुरुवात झाली असेल. त्याचबरोबर भावनेची अभिव्यक्ती करण्याची क्षमताही ध्वनींशी निगडित झाली असेल.

हे सगळे पाहता, अगदी सुरुवातीला देखील भाषा केवळ त्या त्या गोष्टींच्या ध्वनींचे अनुकरण करणारी होती, हे संभवनीय वाटत नाही. काही शब्द तसे होते, याविषयी शंका नाही. तसे ते आजही आहेतच. (उदा., फुत्कार, गुरगुर, खळबळ) आवाज करणाऱ्या वस्तू किंवा कृती यांचेच अशा प्रकारे अनुकरण करणे शक्य आहे. पण आपण पर्वताच्या ध्वनीचे नाही अनुकरण करू शकत! खरं म्हणजे, बऱ्याच शब्दांची शक्ती ते जे सुचवतात, त्यासारखे नसण्यातून आलेली आहे. उदा., 'ओसाडी' घ्या. शब्द ह्या हा एक विशिष्ट ओसाड पडलेल्या वस्तीबद्दल असता, तर ते विशेषनामच झाले असते. प्रत्यक्षात आपल्याला माहीत असलेले ओसाडीचे सर्व प्रकार आणि त्यांविषयीच्या भावना सुचविण्याइतका हा शब्द अर्थभारित होतो. जशी देवळाची ओसाडी, घराची ओसाडी, बंद पडलेल्या कारखान्याची, गमावलेल्या संपत्तीची सुद्धा.

**पदविकार :**

धातू किंवा नाम चालवण्याच्या प्रक्रियेतून सर्व भाषा मुख्यतः घडत गेल्या. आपण एखाद्या वस्तूकडे वा कृतीकडे कोणत्या दृष्टिकोनातून पाहतो. यानुसार त्या वस्तूचा वा कृतीचा बोध करणारा ध्वनी किंचित बदलतो. उदा., लॅटिन बोलणारे रोमचे नागरिक म्हणत :

Homo canem amat (माणूस कुत्र्यावर प्रेम करतो.)

Canis hominem amat. (कुत्रा माणसावर प्रेम करतो.)

प्रेम करणारा अथवा प्रेम केले जाणारा माणूस (वा कुत्रा) हा वेगळा माणूस (वा कुत्रा) असतो, असे त्याला वाटे. पण लोकांना जसजशी स्वतःची अधिक जाणीव होत जाते, आपल्या मनातील भावना- विचारांची अधिक ओळख होत जाते, तसतशी ते ज्या

वस्तूंविषयी भावना-विचार निर्माण होतात, त्या वस्तूंपासून भावना-विचारांना अलग करत जातात. ते शब्दक्रमात बदल करून अथवा प्रत्ययासारखा स्वतंत्र शब्द वापरून, त्यांच्या दृष्टिकोनातील बदल दर्शवतात. नामरूपात वा धातुरूपात कमीत कमी बदल असलेल्या इंग्लिश भाषेत असे दिसते :

The man loves the dog.
The dog loves the man.
The man gives a bone to the dog.

सर्वच भाषांमध्ये शब्दरूपात थोडे तरी बदल होतात. उदा., इंग्लिशमधील काही शब्दरूपे पहावी.

I love him,. He loves me.

**लेखन :**

लेखन आणि भाषण हे वेगवेगळ्या उगमांतून झिरपणारे, काही काळ वेगवेगळे वाहणारे आणि शेवटी मोठ्या नदीत एकत्र येऊन मिळणारे दोन उपप्रवाह आहेत. कानांद्वारे अर्थ पोहोचविण्याचे काम करणे ध्वनींना जसे शक्य होते, तसेच डोळ्यांद्वारा अर्थ सुचविण्याचे काम चित्रांनाही जमते. प्राचीन काळातील लेखन उदा., इजिप्शियन चित्रलिपी, कोलंबसपूर्व काळातील मेक्सिकन लेखन चित्रमालिकारूप होते. वाक्यावाक्यांतून जशी गोष्ट सांगितली जाते, तशी त्यात चित्रमालिकेतून गोष्ट सांगितलेली असे. बोलण्याप्रमाणे लिहिण्याची गरज ही माणसांच्या वाढत्या एकटेपणाच्या जाणिवेतून-समूहाशी संवाद करण्याच्या गरजेतून निर्माण झाली. पण जसे भाषण अवकाशातील एकटेपणाच्या जाणिवेतून सुरू होते -तसे -मी येथे-या - खुर्चीत- एकटा -आणि तू -तेथे- त्या-खुर्चीत - एकटा ; तसे लेखन काळाच्या संदर्भातील तुटलेपणाच्या जाणिवेतून सुरू होते. जसे मी - येथे - आज - आहे -मी -उद्या -नसेन ; मग माझी जागा तू घेशील, तर मग मी तुझ्याशी कसे बोलणार?

लहान गटांत राहणाऱ्या आदिवासी लोकांमध्ये मृत्यूची कल्पना फार अंधूक असते. त्यांना आपल्या टोळीच्या जिवंतपणाची पक्की खात्री असते. त्यांच्या दृष्टीने टोळी कधी नष्टच होत नाही. वर्तमानात अस्तित्वात असलेल्या गटाच्या चिरंतनत्वाची माणसाच्या मनातील जाणीव ज्या क्षणी नष्ट होते, त्या क्षणी त्याला व्यक्तीच्या आयुष्याच्या तोकडेपणाचे आणि अनिश्चिततेचे भान येते. तो मग हताशपणे ती जाणीव दूर ढकलण्यासाठी साधने धुंडाळू लागतो. भूत आणि वर्तमान सांधण्याचा, भविष्यात जगण्याचा मार्ग शोधू लागतो. आपल्याला माहीत असलेले जुने लेख, मृत राजांच्या कामगिरीच्या गोष्टी सांगतात. लेखक म्हणजे जणू बाकावर आपली आद्याक्षरे कोरून ठेवणारा शाळकरी विद्यार्थीच असतो! त्याला अमर व्हायचे असते ना!

लेखनाला भाषणाची जोड कशी मिळाली, याविषयी काही सांगणे अशक्य आहे. पण

लेखन केवळ चित्ररूप राहणे - प्रत्येक वस्तूसाठी स्वतंत्र चित्र असे - लवकरच थांबले असावे. अशा प्रकारच्या भाषेला हजारो अक्षरे बाळगावी लागली असती! इतके करून ती भाषा अवगत व्हायला कठीण आणि लिहायला वेळखाऊ आणि बोजड ठरली असती! चिनी भाषा ही आजही अशा प्रकारची भाषा आहे. पुन्हा अमूर्त कल्पना चित्रांद्वारे व्यक्त करणे अशक्य ठरणार! ('सवयी'चे आपण कसे काय चित्र काढणार?) सुदैवाने माणसाला काढता येणाऱ्या भिन्नभिन्न ध्वनींची संख्या ही तुलनेने मर्यादित आहे, ही गोष्ट म्हणजे, या समस्येवरील तोडगा ठरली. विशिष्ट प्रकारच्या चिन्हाने विशिष्ट ध्वनी दाखवायचा, या पद्धतीच्या वर्णमालेमुळे ध्वनी ज्या क्रमाने निर्माण होतात, त्याला धरून चिन्हांची मांडणी करून, शब्द तयार होऊ लागले. (इंग्रजीची मुळाक्षरे मुळातून इजिप्तमधून फिनीशिया, कॉल्किस (जॉर्जिया) आणि इटलीमार्गे आली आहेत.

**बोली आणि लिखित भाषा :**

जोवर लोक छोट्या समाजगटांतून पिढ्यानूपिढ्या एकाच ठिकाणी राहत असतात, तोवर त्यांना लिहिण्याची फारशी गरज वाटत नाही. काव्य, कथा, नीतिबोध या या गोष्टी पाठ होतात आणि वडिलांकडून मुलांपर्यंत तोंडोतोंडी पोहोचवल्या जात राहतात. लेखनाशी तुलना करता मौखिक परंपरेत काही फायदे अणि तोटे आहेत. साधारणपणे असे म्हणता येईल, की मौखिक परंपरेतून भावनारूप अर्थ विलक्षण अचूकपणे पोहोचवला जातो. कारण शब्दांबरोबर हावभाव आणि आवाजाचा स्वर यांचीही पक्की गाठ आठवणीत पडलेली असते. (काही कालावधीनंतर लेखकाच्या मनात नक्की काय होते, हे ठरवणे लिखित विधानाच्या संदर्भात बऱ्याच वेळा अशक्य ठरते. एखाद्या पत्राबाबत गैरसमज होणे किती सहज शक्य आहे, हे लक्षात घ्या!) याउलट, बोलताना आशयरूप अर्थाचा अनपेक्षितरीत्या विपर्यास होत जातो. एखाद्याला सांगितलेले शब्द जसेच्या तसे न पोहोचणे, विसरले जाणे, त्याऐवजी चुकीचे शब्द अनुमानित करणे; हे सारे अगदी स्वाभाविक आहे. पुन्हा आपल्याला काहीतरी स्पष्ट करायला सांगितले जाण्याची शक्यता असते. त्यामुळे आपल्या स्पष्टीकरणाची त्यात भर पडते आणि मग मूळ गोष्टीबरोबर ते स्पष्टीकरणही पुढे जात राहते. उदा., राखीव दलाला आज्ञा देण्याऱ्या अधिकाऱ्याला पुढील निरोप आघाडीच्या रांगेकडून तोंडोतोंडी आला. मूळ निरोप होता.

'Send reinforcements, the regiment is going to advance.'

प्रत्यक्षात पोहोचलेला निरोप होता.

'Send three and four pence, the regiment is going to dance.'

(आपला मराठीतील कानगोष्टीचा खेळ आठवून पाहावा- अनुवादक)

जेव्हा समाज आकाराने वाढत गेला आणि शासन केंद्रवर्ती बनले, तेव्हा मात्र लेखनाला अधिकाधिक महत्त्व येऊ लागले. तरीही जोवर मूळ हस्तलिखितातून हाताने नकलून घेणे चालू होते, तोवर पुस्तके दुर्मीळ आणि महाग होती. परिणामी ती कोणालाही

सहज मिळण्याजोगी नसून, फारच थोड्यांसाठी उपलब्ध होती. जेव्हा पंधराव्या शतकात छापण्याची कला अवगत झाली, तेव्हा लिखित शब्दाचे सामर्थ्य खूपच वाढले. तरीही पुस्तकांच्या किमतींमुळे त्यांचे प्रसारण खूपच मर्यादित राहिले. सोळाव्या आणि सतराव्या शतकात काही धार्मिक पुस्तके वगळता, इतर लोकप्रिय छापील वाङ्मय रस्त्यांवरील फिरत्या विक्रेत्यांजवळील पुस्तिका आणि पत्रिका या रूपात अडकून राहिले. (या पत्रिका म्हणजे ब्रॉडशीटचा आजचा वंशज म्हणजे वृत्तपत्र-अनुवादक) अठराव्या शतकात नियतकालिके आणि वर्तमानपत्रे निघायला लागली आणि वाफेच्या शक्तीच्या वापरामुळे एकोणिसाव्या शतकाच्या आरंभी उत्पादनाचा खर्च कमी होऊन छापील मजकूर खरेदी करणे ही गोष्ट लिहितावाचता येणाऱ्या कोणाच्याही आवाक्यातील झाली. (एका पेनीत पत्र पोहोचवणाऱ्या टपालाची सुरुवात आणि सार्वत्रिक शिक्षणाचा परिणामही लक्षात घ्या. गेल्या पाच वर्षांत तर रेडिओ आणि बोलपट यांमुळे उच्चारित शब्दाला नवे जीवदान लाभाले आहे.)

या सगळ्याचा परिणाम काहीसा संमिश्र स्वरूपाचा आहे. त्यामुळे भाषा विविध विषयांची मोठ्या प्रमाणावर दखल घेऊ लागली. विशेषतः, काही शास्त्रांसारख्या अमूर्त गोष्टी भाषेच्या आटोक्यात आल्या. भाषा अधिक अचूक होऊ लागली. अर्थनिश्चिंतीची रेषा अधिक सूक्ष्म होऊ लागली. एका भाषेतील शब्द दुसऱ्या भाषेत अनुवादित होऊ लागले. आपल्या भाषेत एखादा शब्द नसेल, तर तो शब्द दुसऱ्या भाषेतून हव्या त्या नेमक्या अर्थच्छटेसह उसनवार घेतला जाऊ लागला. (उदा. clock च्या जोडीला chronometer, stranger च्या जोडीला alien) परंतु शब्दसंग्रहातील वाढीमुळे भाषा शिकणे अवघड होत जाते. कारण केवळ शब्द शिकायचे नसतात. तर ते कसे वापरायचे, हेही शिकायचे असते. त्यामुळे भाषेच्या वापराबाबतचे शिक्षण अधिकाधिक आवश्यक ठरू लागते. हल्ली कोणीही असे शिक्षण घेत नसतो. विद्यापीठाच्या साधारण दर्जाच्या पदवीधरापेक्षा शेतकऱ्याचे बोलणे साधारणपणे चांगले कळते. आपल्याला काय हवे आहे, ते शेतकरी स्पष्टपणे सांगू शकतो. पदवीधराचे बोलणे म्हणजे अनेक चेंडू हाताने चलाखीने खेळविण्यासारखे असते. तुम्ही कदाचित तीन चेंडूंशी चांगला हातचलाखीचा खेळ खेळू शकाल; पण काळजीपूर्वक सराव न करता, एकदम सहा चेंडूंशी खेळायला जाल, तर कदाचित सगळेच हातातून गमावाल! यात भाषेला बोल लावायचे कारण नाही, कमी पडते आहे, ते आपले भाषाकौशल्य!

**पद्याचे घाट :**

समुदाय उद्दीपित झाला असताना निर्माण झालेल्या आवाजातून बोलणे जन्माला आले. भावनांचे उद्दीपन सहजपणे कृतीला प्रेरक ठरते. आपल्या भावना चेतावल्या गेल्या, की आपल्याला नाचावेसे वाटते. अशा प्रकारे सुरुवातीला खाद्यपदार्थांभोवतीच्या फेऱ्या किंवा हल्ला करण्यासाठी चालून जाणे अशा सामुदायिक कृतींशी आरडाओरडीचे साहचर्य

होते. भावनांचा जोश जितका अधिक, गटातील प्रत्येक सदस्याविषयीचा सहानुभाव जितका अधिक, तितक्या हालचाली अधिक नियमित, त्या ठरीव कालांतराने घडणार, प्रत्येकाचे पाऊल एका वेळी पडणार!

गोलाकार उभे राहून नृत्य करणारे लोक डोळ्यांसमोर आणा. वर्तुळ फिरत राहते आणि पुन्हा मूळ ठिकाणी परतते. प्रत्येक बदलाच्या वेळी हालचालींचा ठरावीक आकृतिबंध पुन्हा पुन्हा येत राहतो.

शब्द जेव्हा असे पुनरावर्ती पद्धतीने गतिमान होतात, तेव्हा त्या गतीच्या आपल्या मनावर होणाऱ्या परिणामाला आपण 'वृत्त किंवा छंद' म्हणतो. वृत्तात किंवा छंदात बांधलेले शब्द म्हणजे 'पद्य' होय. एकटे असण्यापेक्षा गर्दीत असल्यावर आपण चटकन भावनांनी भारावून जाऊ शकतो. तसेच काहीसे वृत्त आपल्याला उत्तेजित करते आणि जे सांगितले आहे, ते ग्रहण करायला उत्सुक करते. काहीतरी घडेल, अशी आपली अपेक्षा असते आणि तसे घडतेही! जेव्हा कवी वृत्तबद्ध काव्य लिहितो तेव्हा त्यातील भावना जणू शब्दांना उत्तेजित करतात आणि त्यांना विशिष्ट असा नाचऱ्या विभ्रमांसकट विशिष्ट गटांमध्ये जायला भाग पाडतात - अगदी भावनांमुळे गर्दीतील लोक जसे उत्तेजित होतात ना, तसे! वृत्त म्हणजे शब्दांमधील सामुदायिक उद्दीपन, पुनरावर्तित विभ्रमांची मालिकाच! उद्दीपन कमी प्रमाणात असेल, तर शब्द परस्परांशी आणि एकत्रितरीत्या संलग्न होणे, कमी प्रमाणात घडेल (एक शब्द दुसऱ्या शब्दाकडून जी अपेक्षा करतो, ती म्हणजे लय) शास्त्रीय गद्यात शब्द केवळ आशयाला जे सांगायचे आहे, त्याच्याच नियमनाखाली वावरतात. एखाद्या नेहमीच्या दिवशी रस्त्यावर वावरणाऱ्या लोकांसारखे ते असतात. ते जोवर रस्त्याच्या डाव्या बाजूला आहेत आणि एकमेकांना त्रास देत नाहीत; तोवर त्यांना हवे ते करण्याची मुभा असते. पण येथेही किमान एवढे तरी अपेक्षित आहे. भाषेतही काही अंशी लय अस्तित्वात असतेच. भावनेच्या सामर्थ्यावर तिचा चढउतार अवलंबून असतो.

आघात, लघु-गुरू अक्षरे या सर्व, खरं तर, फार साध्या गोष्टी आहेत. तुम्हांला अर्थाचे चार प्रकार माहीत असतील, तर तुम्हांला कविता चांगल्या प्रकारे वाचता येतील. पारंपरिक नृत्यात जसे पदन्यास ठरलेले असतात, तसे काव्यलेखनाबाबत काही संकेत ठरलेले असतात. तरीही चांगल्या नर्तकाप्रमाणे चांगला कवीही ते संकेत खास स्वतःच्या पद्धतीने दुसऱ्या कोणा कवीपेक्षा वेगळ्या शैलीने वापरतो. तुम्ही एखाद्या नाचाचे वर्णन अनेक प्रकारे करू शकता - दहा पदन्यास, चार ठाशीव आणि सहा हलके पदन्यास, तीन ठाशीव आणि सहा हलके पदन्यास, तशाच प्रकारे आपण ज्या दृष्टिकोनातून काव्याकडे पाहणे पसंत करू, त्या पद्धतीने काव्याच्या छंदोबद्धतेचे वर्णन करता येते. इंग्लिश काव्यात आपण साधारणतः स्वराघातांद्वारे हलके आणि ठाशीव आघात वर्णन करतो. कारण इंग्लिश बोलण्याच्या बोलण्याच्या गतीचे ते एक महत्त्वाचे लक्षण आहे. पण हे लक्षात ठेवावे, की असे गतीचे वर्णन केवळ एक वर्णन आहे. गतीचे वर्णन म्हणजे गती नव्हे.





अनुक्रमणिका

शेवटी भाषा अनेक प्रकारे सजवली जाते. भाषेचे परिचित दोन अलंकार म्हणजे यमक आणि अनुप्रास होय. (उदा. 'Old King Cole was a merry old soul मधील 'ओल'ची आवृत्ती) (In a summer season, when soft was the Sun मधील सकाराची आवृत्ती)

ट्यूटॉनिक (म्हणजे जर्मॅनिक) लोकांच्या सुरुवातीच्या पद्यरचनांमध्ये अनुप्रास आढळतात. यमक बहुधा पहिल्यांदा रोमन सैनिकांच्या कूच करतानाच्या गीतांमध्ये आढळते. तेथून ते पूर्वीच्या ख्रिश्चन धार्मिक स्तोत्रांमध्ये आणि तेथून आधुनिक काव्यात आले असावे. सारख्या ध्वनींनी सुरू होणाऱ्या शब्दांच्या जुळणीतून अनुप्रास साधला जातो, तर सारख्या ध्वनींनी विराम पावणाऱ्या शब्दांमुळे यमक साधते. ध्वनी एकसारखे असतात. पण वेगवेगळ्या शब्दांत समाविष्ट होतात आणि प्रत्येक ठिकाणी वेगवेगळा अर्थ व्यक्त करतात. या साम्यातून मनामध्ये वेगवेगळ्या रूपांत असलेल्या विचार आणि भावना यांचे संश्लेषण होते. खरे तर, ती ध्वनिरूपकेच असतात.

**लेखनाचे विविध प्रकार :**

लेखनाचे वेगवेगळे प्रकार हे खरे म्हणजे लेखनातील वेगळेपणामुळे ठरत नसून, आपण त्याकडे कशा प्रकारे पाहतो, यातून ठरतात. (शिवाय अर्थात आपण कशा प्रकारे पाहावे, अशी लेखकाची इच्छा असते, त्यातूनही. मात्र आपल्याला लेखकाची इच्छा फार कमी कळते!) आपल्या मनाच्या बाहेर साहित्यातील घाटांना अस्तित्व नाही. आपण जेव्हा वाचत असतो - मग ते काहीही असो, शास्त्रीय प्रयोगाचे वर्णन, इतिहासाचे पुस्तक किंवा कादंबरी - आपण जर एखाद्याच्या संदर्भात एकामागोमाग घटना कशा घडत आहेत, हे पाहण्यासाठी वाचत असू, तर ती कथा विशिष्ट परिस्थितीत, कोण, कसे वागते, हे जाणण्यासाठी वाचत असू, तर ते शास्त्र, आणि भूतकाळात प्रत्यक्ष काय घडले, हे माहीत करून घेण्यासाठी वाचत असू, तर तो इतिहास!

काव्य आणि गद्य यांच्यांत काय फरक आहे, असे लोक नेहमी विचारतात. लेखक गोष्टींकडे कशा दृष्टिकोनातून पाहतो, यातच फरक आहे. (पद्य आणि गद्य यांतला फरक निराळ्या स्वरूपाचा आहे. त्याची चर्चा अगोदर आलीच आहे.) उदा., कादंबरीकार मनात सर्वसाधारण कल्पना धरून लिहायला लागतो. जसं - लोक नेहमी जबाबदारी टाळण्यासाठी त्यापासून पळून जाऊ इच्छितात. गंमत म्हणजे, त्यांची पळवाट त्यांना आंणखी वाईट गोंधळात नेऊन सोडते, तेव्हा तो श्रीयुत आणि श्रीमती स्मिथ यांच्या बाबतीत काय घडले, ही गोष्ट लिहितो, तो कदाचित स्मिथ मंडळींनी पळवाट शोधली, असे स्पष्ट शब्दांत सांगणारही नाही. पण तरीही या कल्पनेच्या प्रेरणेतूनच त्याच्या गोष्टीची वाटचाल होत राहते. याउलट, कवी आपल्या क्लबमधील गप्पांमधील श्रीयुत आणि श्रीमती स्मिथ यांची दुःखपूर्ण हकीकत ऐकेल आणि मनाशी म्हणेल - 'अस्सं! ही तर गंमतच आहे. इतर सगळ्यांसारखीच त्यांची गत आहे- आयुष्याला वळसा घालून जाण्याची धडपड.

उत्तरपश्चिम मार्गाने भारताकडे जाऊ इच्छिणाऱ्या (१४९७ ते १६१६ या काळातील अपेशी युरोपियन) नावाड्यांसारखे ते आहेत. या पद्धतीने ते घरापासून हजारो मैल दूर जातात आणि बर्फात अधिकाधिक रुतत जातात. कवितेला ही कल्पना छान आहे.... 'तो नवे मार्ग शोधून काढणाऱ्यांविषयी कविता लिहितो. तो कदाचित स्मिथ दांपत्यांचा उल्लेखही करणार नाही. कादंबरीकार सामान्याकडून विशिष्टाकडे जातो, तर कवी विशिष्टाकडून सामान्याकडे जातो. दोघांच्या शब्दयोजनेतही हा फरक लक्षात येतो. कादंबरीकार सर्वसामान्य अर्थाने शब्द वापरतो आणि ते विशिष्ट व्यक्तिरेखा उभी करण्यासाठी तो पुष्कळ प्रमाणात खर्च करतो. तर कवी स्वतःची कल्पना साकार करून सर्वसाधारण परिणाम साधला जाईल, असे शब्द विशिष्ट अर्थाने वापरतो. प्रत्यक्षात मात्र अगदी छोट्या कविता वगळता, सर्व काव्य आणि कादंबऱ्या यांमध्ये दोन्ही प्रकारे कथावस्तूकडे पाहण्याची क्षमता असते. (चॉसरचे काव्य 'कँटरबरी टेल्स' म्हणजे पद्य-कादंबरीच म्हणावी लागेल, तर मोलव्हिलची कादंबरी 'मॉबी डिक' म्हणजे गद्यातील दीर्घकाव्य आहे.) आपण फार तर इतकेच म्हणू शकतो, की ही वैशिष्ट्यपूर्ण शैली कादंबरीकाराची आहे आणि ती कवीची आहे!

**मंडळी पुस्तके का लिहितात?**

वाचले जावे, म्हणून लोक लिहितात. माणसामाणसांकडून आणि निरंतर वाचले जावे, ही त्यांची इच्छा असते. परस्परांशी संपर्क तुटलेल्या निरुत्सुक जगात आणि तेही अल्पकाळ वावरताना माणसांना एकाकी वाटते. मग त्यांना दुसऱ्यांशी संपर्क ठेवायचे कसे जमणार? ते त्यांची आयुर्मर्यादा कशी वाढवणार? मुले आपल्या देहाद्वारे जगणार, त्यांना न बघायला मिळालेले बघणार, त्यांना अज्ञात अशा मित्रमंडळींचा गोतावळा जमवणार. पुढे मग या त्यांच्या मुलांनाही मुले होणार. या सगळ्यांतून ते अंशरूपाने जगत राहणार. शरीराने जगणार; पुस्तकांतून ते मनाने जगणार.

कोणतीही इच्छा पुरी होणे, नेहमीच आनंददायक असते. आपण भरल्या पोटाचा आनंद अनुभवतो, असे नसून, आपण खाण्याचाही आनंद लुटतो. तसेच ते त्यात आनंद वाटतो म्हणून पुस्तके लिहितात. जसे सुताराला नाही का कपाट करण्यात आनंद वाटत, तसेच! पैशासाठी, जगाला बदलण्यासाठी, वेळ घालवण्यासाठीही पुस्तके लिहिली जातात, नाही, असे नाही. पण ही कारणे नेहमीच क्षुल्लक ठरतात. याव्यतिरिक्त महत्त्वाची दोन कारणे आहेत, ती म्हणजे सहवासाचा आनंद आणि निर्मितीचा आनंद!

**मंडळी पुस्तके लिहितात तरी कशी?**

बाळे किंवा रोपे कशी बनतात, याविषयी जितपत माहिती असते, तितपतच पुस्तके कशी बनतात, याविषयी आपल्याला माहिती असते. ज़ास्तीची काही नाही. अचानक एखादी कल्पना, एखादी भावना लेखकाच्या मनात रुजते आणि वाढू लागते. त्याला तिची निगराणी करावी लागते. स्वतःच्या अनुभवातून खतपाणी घालावे लागते. स्वतःचे अनुभव म्हणजे त्याला समजलेले, त्याला जाणवलेले, त्याच्या जीवनात घडलेले असे सर्व काही!

हे करताना तो एखादा धुमारा सरळ बांधून घेतो, एखादी छाटणी करतो, पुढे त्यातून काय निष्पन्न होणार, याविषयी त्याला काहीच खात्री देता येत नाही. एखाद्या रात्रीत कावळ्याच्या छत्रीसारखे ते उगवणार, की हळूहळू वाढणाऱ्या दमदार प्रचंड ओक वृक्षात रूपांतरित होणार?

लेखक हा माती आणि माळी दोन्ही असतो. त्याच्यातील 'माती'ला काय चालले आहे, याची खबर नसते, तर त्याच्यातील माळ्याला कामाची चाकोरी माहीत झालेली असते. तो कदाचित कुशल माळी असेल, पण माती कच्ची असेल, तर त्याची पुस्तके आकर्षक रीतीने लिहिलेली असतील; पण त्यांत काही दम नसेल! आपण म्हणू, त्याच्यामध्ये मंत्रशक्ती वा स्फूर्ती नाही. कदाचित त्याच्यातील माती छान असेल, पण माळी निष्काळजी असेल-त्याची पुस्तके उत्तेजित करणारी असतील, पण ढिसाळ, प्रमाणबद्धता नसलेली, कानाने ऐकवत नाहीत, अशी असतील! आपण म्हणू, त्याच्याकडे मंत्र नाही. चांगल्या माळ्यापेक्षा चांगली माती अधिक महत्वाची असते. पण उत्कृष्ट रोपे ही दोहोंच्या संयोगातूनच जन्माला येतात.

**लोक पुस्तके का वाचतात?**

आपण जेव्हा पुस्तक वाचतो. तेव्हा एक प्रकारे एका व्यक्तीच्या संगतीत असतो. पुस्तक म्हणजे केवळ त्यातील शब्दांचा अर्थ नव्हे. तर तो अर्थ सांगणारी व्यक्तीसुद्धा असते. प्रत्यक्षात आपण कितीतरी प्रकारे माणसांना वागवत असतो. समजा, आपण पोलिसाला रस्ता विचारत आहोत. जोवर तो शिष्टाचार पाळतो, तोवर तो त्याच्या बायकोला मारतो किंवा काय, याच्याशी आपल्याला काही एक कर्तव्य नसते. खरे म्हणजे, तो जर आपल्या बायकोविषयी सांगू लागला, तर आपण चुळबूळ करू. त्याला रस्ता माहीत असावा आणि त्याने तो व्यवस्थितपणे सांगावा, एवढीच त्याच्याकडून आपली माफक अपेक्षा असते. पण इतर काही व्यक्तींशी आपण वेगळ्या प्रकारे वागतो. त्यांच्याकडून आपल्याला माहितीहून अधिक काही हवे असते. आपल्याला त्यांच्यासमवेत जगायचे असते. त्यांच्याबरोबर भावना अनुभवायच्या असतांत. विचार करायचा असतो. आपण जेव्हा म्हणतो, की अमुक एक पुस्तक चांगले किंवा वाईट आहे, तेव्हा चांगल्या किंवा वाईट व्यक्तीविषयी आपल्याला जे वाटते, ते त्या पुस्तकाविषयी वाटते; असे आपल्याला म्हणायचे असते. (वाईट व्यक्तींविषयी बोलणारा माणूस जसा वाईट ठरत नाही, तसेच वाईट व्यक्तिरेखांविषयीचे पुस्तक त्यामुळे वाईट ठरत नाही आणि चांगल्या व्यक्तिरेखांविषयीचे पुस्तक त्या कारणाने चांगलेही ठरत नाही, हे लक्षात ठेवलेले बरे!) खरे म्हणजे आपण चांगल्या किंवा वाईट या दोन गटांत माणसांना विभागू शकत नाही, हे आपल्याला पक्के माहीत असते. प्रत्येक व्यक्ती हे चांगल्या-वाईटाचे मिश्रण असते. आपल्याला काही लोक काही मनःस्थितीत आवडतात तर काही लोक दुसऱ्या! आपण जसजसे मोठे होतो, तसतशी आपली लोकांविषयीची आवडनिवड बदलत जाते. पुस्तकांबाबतही हाच न्याय लागू ठरतो. 'आम्हांला फक्त

चांगलीच पुस्तके आवडतात', असे म्हणणारे लोक घमेंडखोर असतात. आपणां सगळ्यांना काही चांगली व काही वाईट पुस्तके आवडत असतात. वाईट पुस्तकेही चांगलीच आहेत, असा आव आणणे, ही मात्र अत्यंत मूर्खपणाची गोष्ट ठरते. तसेच पुस्तकांची चर्चा किंवा परीक्षण करताना लोकांनी जर हा विचार केला, की एखाद्या व्यक्तींविषयी आपण असे बोलू का? - तर ते कधीकधी भयंकर मूर्खपणाचे जे बोलतात, ते टाळले जाईल!

वानगीदाखल - लोक पुष्कळदा असे म्हणतात, की त्यांच्या मतांशी न जुळणारी पुस्तके त्यांना आवडत नाहीत! प्रत्येक गोष्टीत आपल्यासारखीच मते असणाऱ्या माणसांशीच केवळ मैत्री करणाऱ्या माणसांचे वागणे काहीसे मूर्खपणाचेच नाही का वाटत?

पुस्तके ही अगदी माणसांसारखीच असतात. म्हणून तर वाचनाचे महत्त्व आहे. माणूस म्हटला, की त्याला समजून घ्यावे आणि पटवून घ्यावे आणि पटवून घ्यावे, ही मागणी आलीच. पुस्तकांकडून देखील तशी दुहेरी मागणी असतेच. आपले मित्रांचे वर्तुळ साधारणतः मर्यादित स्वरूपाचे असते. आपली त्यांच्याशी असलेली नाती जशी असावी, तशी नाहीत, नको तितका गुंता, अडचणी, असमाधान यांनी अवघडलेली आहेत - असे आपल्याला वाटत असते. मुष्टियोद्धा स्पर्धेच्या सरावासाठी जसं पंचबॉलशी किंवा दुसऱ्या मुष्टियोद्ध्याशी लटके खेळतो, तसं तुम्ही प्रत्यक्षातील व्यक्तींशी नातेसंबंध ठेवण्याच्या सरावासाठी पुस्तके वापरू शकता. हे सोपे नाही. मुख्य म्हणजे, प्रत्यक्षातील व्यक्तींचा अनुभव गाठीशी असल्याखेरीज तुम्ही सुरुवात करू शकणार नाही. (मुष्टिकलेतील गमभन कळत असल्याखेरीज मुष्टियोद्धा पंचबॉलशी तरी काय खेळू शकणार?) पण पुस्तके माणसांपेक्षा थोडी वेगळी असतात - ती मरत नाहीत, भांडत नाहीत किंवा सोडून जात नाहीत. वाचन आणि जीवन हे दोन हवाबंद कप्पे नाहीत. आपली माणसांविषयीची समजूत तुम्ही पुस्तके वाचताना कामी आणू शकता आणि तुमची पुस्तकांतून आलेली समज माणसांबरोबर वागतासवरताना उपयोगात आणू शकता. तुम्ही जितके वाचत जाल, तितके माणसांबरोबरचे नातेसंबंधही किती अवघड आणि नाजूक गोष्ट आहे, हे जाणाल! इतकंच काय, ते नातेसंबंध जेव्हा 'जमून' येतात, तेव्हा ते किती मोलाचे असतात. तेही जाणाल! तुम्ही जितके इतर माणसांना ओळखू लागाल, तितके हरतऱ्हेच्या पुस्तकातून स्वतःला संपन्न करू शकाल आणि मग उत्कृष्ट पुस्तक खरोखर किती भले करू शकते; हे तुम्हांला समजेल! पण काय ....उत्कृष्ट पुस्तके ही उत्कृष्ट माणसांइतकीच दुर्मीळ असतात!

वाचन जेव्हा आपले जगण्यातील कौशल्य वाढवते, आपल्याला अधिक भरगच्च, अधिक समाधानी जीवन जगायला मदत करते, तेव्हा त्याची विशेष मातब्बरी असते. उलटपक्षी, जेव्हा आपण काय वाचत आहोत, ते आपल्याला कळत नाही किंवा भावत नाही, (याचे कारण कदाचित आपले अज्ञान असेल किंवा लेखनातील क्लिष्टता असेल) तेव्हा ते फोल ठरते.

जे वाचन आपल्याला भावना आणि विचार ढोबळ किंवा भरड प्रकारे अनुभवायला उत्तेजन देते, तसलेच वाचन जेव्हा आपण करत राहतो, जेव्हा त्यात अवश्य धोका असतो. ते अगदी सुमार लोकांच्या संगतीसारखे असते! (बरेच लोक, त्यांना खूश करील, असेच वाचतात, 'आपण किती छान आहोत', नाही तर 'छान' जगात सगळे किती छान घडत आहे', असे सांगत राहणारेच काय ते वाचतात. नाही तर त्यांना उत्तेजित करणारे ते वाचत राहतात किंवा त्यांना उद्या भरायच्या बिलांचा विसर पाडणारे असेच वाचत राहतात.) वाचन जेव्हा जगण्याला पर्याय बनू लागते, म्हणजे आपण प्रत्यक्षातील लोकांना घाबरू लागतो आणि पुस्तकांच्या सहवासात अधिक सुरक्षित समजू लागतो, तेव्हा ते धोक्याचे ठरते. पुस्तके म्हणजे प्रत्यक्ष जगणे नव्हे, ती जगण्याची रंगीत तालीम आहे. पुस्तकातील किड्यांना वास्तवाच्या रंगमंचावर कापरे भरते.

**पुस्तके आणि जीवन**

विशिष्ट ठिकाणी, विशिष्ट काळी जगणाऱ्या कोणा एकाकडून पुस्तक निर्माण झालेले असते. माणसे विशिष्ट स्वभाव घेऊन जन्म घेतात आणि आपापला जन्म काढतात; पण त्यामुळे तो मूळ स्वभाव पालटतो. त्यांच्या जवळ उपजत देणगी असली, तरी ते ज्या समाजात राहतात, त्यात ते तिचा विकास किंवा वापर करू शकत नाहीत. उलट, कदाचित ते सुमार बकुबाचे असतील पण ही मर्यादित देणगी अधिकाधिक खुलेल, अशी संधी त्यांना मिळाली असेल! प्रतिभा आणि संधी यांच्या संगमातून मोठी माणसे घडतात. मोठ्या माणसांइतकीच मोठी पुस्तके दुर्मिळ असतात. त्यांच्याप्रमाणे अनेकदा ती जथ्याने जन्माला येतात. अकराव्या शतकातील इंग्लंडमधील माणसांपेक्षा सोळाव्या शतकातील इंग्लंडमधील माणसे जन्मतः अधिक प्रतिभासंपन्न होती, असे मानणे अवघड आहे. पण त्यांना अधिक वाव मिळाला असेल. जास्त प्रमाणात उत्तेजन देणारे वातावरण मिळाले असेल. साहित्यक्षेत्रातील प्रतिभासंपन्न थोर मंडळींची नावे आठवा होमर, दांते, शेक्सपिअरः होमरने महाकाव्य नामक वैशिष्ट्यपूर्ण काव्य लिहिले. त्यात एकाच्या नेतृत्वाखाली तरुण योद्ध्यांच्या लहान गटाने केलेल्या कामगिरीच्या हकीगती पद्यात सांगितल्या आहेत. धाडसी नाही तर चाचे लोकांच्या टोळ्यांच्या हकीगती आहेत. नेत्यावरील श्रद्धेपोटी, तसेच लढाई, शेती आणि बायको मिळवणे अशा सर्वांना स्वारस्थ वाटणाऱ्या गोष्टींमुळे एकत्र आलेल्या समाजाची कथा सांगितली आहे. डांटे हा फ्लॉरेन्स या लहान आणि महत्त्वाकांक्षी नगरराज्याचा नागरिक होता. (वैश्विक धर्म राज्याचा - कॅथॉलिक चर्चचाही तो नागरिक होता) शेक्सपिअर हा छोट्या, नव्याने आकाराला येणाऱ्या, स्वातंत्र्याला जपणाऱ्या देशात जन्मला होता. लहान आकाराचा समाज आणि त्याला एकत्रित ठेवणारे हितसंबंध - हे त्यांच्या तिघांमधील साम्य आहे. समाज जेव्हा एकजिनसी असतो (मोठा समाज एकजिनसी होणे अवघड असते. त्यातून भरड किंवा हिंसक भावनांचा उद्रेक होऊ शकतो.) तेव्हा उत्कृष्ट लेखनाला धुमारे फुटतात. आपल्याला केवळ





अनुक्रमणिका

दोन-तीनच प्रथम दर्जाचे लेखक आढळत नाहीत, तर चांगल्या लहान लेखकांचा छोटा समूहच आढळतो. ख्रिस्तपूर्व पाचव्या शतकातील अथेन्स आणि एलिझाबेदन काळातील गीतकार आठवा! (आपल्याकडे मराठीत एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस आणि विसाव्या शतकाच्या आरंभी अनेक चांगले लेखक उदयाला आले - अनुवादक) जहाजाचा दोर खेचणाऱ्या खलाश्यांसारखे ते सारे एक होतात आणि त्यातच त्यांचे बळ आहे.

पण जेव्हा जेव्हा समाज गरीब आणि श्रीमंतवर्गांत अथवा अनेक संप्रदायांत किंवा नागर आणि ग्रामीण अशा भेदांनी विभागला जातो, तेव्हा साहित्याची हानी होते.* तेव्हा मग खानदानी आणि साधे, उच्चभ्रू आणि निम्नभ्रू असे विभागून लेखन होऊ लागते. पहिले अधिकाधिक सफाईदार, तर दुसरे अधिकाधिक ओबडधोबड, गावंढळ असे होऊ लागते. परिणामी आज एकीकडे स्वतःला शहाणे समजणाऱ्या लोकांनी आपल्याविषयी आणि आपल्यासाठीच लिहिलेले साहित्य बंदिस्त करून टाकले आहे किंवा दुसरीकडे इतरेजनांचे सस्ते आणि ओंगळ लेखन खरडले जात आहे. प्रतिभा नष्ट होत नाही, पण ती आपली ओळख पटवू शकत नाही. लेखनामागचे खरे कारण, एकमेकांमधील दरी सांधणे हे आहे. एकटेपणाची भावना जितकी वाढीस लागेल, तितकी अधिकाधिक संख्येने जास्तीत जास्त लोकांकडून पुस्तके लिहिली जातील. त्यांतील बऱ्याच जणांकडे प्रतिभा जेमतेमच असेल किंवा नसेलही! कागदासाठी जंगले तोडली जात आहेत. शाईच्या नद्या सुकत चालल्या आहेत. पण तरीही लिहिण्याची हौस अजूनही शमलेली नाही! यातून काय होणार आहे? केवळ लिहिण्यापुरताच प्रश्न असता, तर काळजी करायचे कारण नव्हते. पण तो आपल्या आरोग्याचा आलेख आहे. उतरणीला लागत आहेत, ती केवळ पुस्तके नाहीत; तर आपली आयुष्येच आहेत!

मूळ प्रकाशन 'Writing' ,समावेश. नेओमी मिचिसन, संपादक, 'An Outline for Boys and Girls and Their Parents', London, 1932.

टीप : हा मुद्दा कदाचित वादविषय ठरू शकेल. कारण समाजातील अंतर्गत संघर्षामुळे चांगल्या साहित्याला प्रेरणाही मिळू शकते. कदाचित अशा भेदांमुळे साहित्यविश्व निकोप राहत नाही; या व्यापक अर्थाने 'Literature suffers' असे लेखकाने म्हटले असावे.

**३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे, २**



---

## भाषा संपन्न कशी होते?

नवा विचार आला की भाषा नवे रंगरूप घेऊन आपल्यापाशी येते, आणि तो व्यक्त करण्याच्या प्रयत्नात तीच स्वतः संपन्न होऊन जाते.

**यशवंतराव चव्हाण.**

# कादंबरीकार

**विस्टॅन ह्यू ऑडन**

प्रतिभेच्या फिट्ट बसणाऱ्या गणवेशात वावरणाऱ्या.
कवींचा जो काय दर्जा, तो सर्वांना ठाऊक.
त्याने काहीही करावे-- वादळवाऱ्यासारखे आपल्याला थक्क करावे
वा अल्पायुषी मरून खूप मागे ठेवावे वा वर्षानुवर्षे एकांतवास पत्करावा
वा आघाडीच्या घोडदळासारखी दौड मारावी;पण तो...
त्याला मात्र पोरवयातली देणगी अव्हेरलीच पाहिजे, शिकून घेतले पाहिजे चारचौघासारखे मागेच पडायला;
कुणी त्याच्याकडे ढुंकून फिरकायला नकोच मुळी.

का पण ? कारण त्याला जरी थोडकेच साधायचे, तरी सुद्धा
कंटाळ्याचे दशावतार व्हायला पाहिजे;
सोसायच्या आहेत मामुली व्याधी (आपलं प्रेमबीम हो);
नेक लोकांच्या संगतीत नेक आणि ओंगळांच्या संगतीत ओंगळ सुद्धा!
आणि जमेल तितपत आपल्या दुबळ्या कुडीनिशी मख्खपणे
मानवाचे समस्त दुर्विलास सहन करायचे आहेत.

मूळ कविता 'द नॉव्हेलिस्ट' चे प्रकाशन , पेंग्विन न्यू रायटिंग अंक १० नोव्हेंबर १९४१; मराठी अनुवादाचे पूर्वप्रकाशन सत्यकथा जानेवारी १९७० पृ. ७१, अनुवादकः अशोक रा. केळकर

**अनुवादकाचा पत्ताः- ७ धनंजय ,७५९।८३ भांडारकर रस्ता गल्ली,पुणे ४११००४.**

❒❒

---

## शिक्षणात मातृभाषाच का असावी?

शब्दांशी जवळीक नसली तर विचार करण्याचे साधन नाहीसे होते. विचार भावनांच्या देवघेवीचे मार्गच खुंटतात. म्हणून शिक्षण मातृभाषेत असावे असे वाटते.

**गीता साने.**

# साजिंदा व बाजिंदा

श्रीपाद जोशी

'उर्दू-मराठी - हिंदी' हा एक प्रकारचा त्रैभाषिक शब्दकोश तयार करताना अनेक शब्दांनी गोंधळून टाकले. त्यांपैकी बाजिंदा हा एक होता. 'महाराष्ट्र शब्दकोशा' ने त्याचे अर्थ असे दिले आहेत :- १) खेळाडू; लुच्चा, हट्टी; खोडकर २) धूर्त; निष्णात; निपुण; फसवणूक करणारा. (निंदार्थी) फरडा; जहामबाज... ३) बजवय्या (फा. बाझन्दा). फार्शी-मराठी - कोश' (मा. त्रिं.पटवर्धन) यामध्ये बाजिन्दा पु. (फा. बाझन्दा) खेळाडू, बजवय्या, फसवणूक करणारा असा अर्थ दिला आहे. मात्र 'मराठी व्युत्पत्ति कोशा'च्या तिसऱ्या आवृत्तीच्या पुरवणीत त्या पुरवणीच्या संपादकाने (म्हणजे मीच) 'बाजिंदा (फा. बाझिंन्दः- धूर्त खेळाडू)' अशी नोंद केली आहे. 'उर्दू-मराठी शब्दकोश,' उर्दू हिंदी शब्दकोश,' 'लुगाते सईदी', 'फीरोजु ल्लुगाते उर्दू', वगैरे शब्दकोशांनी 'लबाड व खेळाडू' हेच दोन अर्थ 'बाझिंद :' या शब्दाचे दिले आहेत. 'दि शॉर्टर पर्शियन-इंग्लिश डिक्शनरी' (तहेरान १९९४) या कोशाने तर 'बाझिंदः'चा Loser(गमावणारा ) असा वेगळाच अर्थ दिला आहे. 'भाषा शब्दकोश' व 'बृहत् हिन्दी कोश' यांसारख्या प्रमाणित हिंदी शब्दकोशांनी 'बाजंदा' किंवा 'बाजिंदा' हा शब्दच दिलेला नाही. मग मराठीतच 'बाजिंदा' या शब्दाचा 'बजवैया'(वाद्यवादक) हा अर्थ कोठून आला? 'फार्शी-मराठी-कोश' हा सर्वांत जुना(१९२५ सालचा) असल्यामुळे त्यात दिलेला अर्थच इतरांनी डोळे मिटून प्रमाण मानला, हे स्पष्ट दिसून येते. माधवरावांची तरी अशी दिशाभूल का झाली असावी?

'साजिंदा' हा शब्द कसा बनला, हे जाणून घेतले, की 'बाजिंदा'चे कोडे उलगडते. 'साज' किंवा 'साझ' या फारसी शब्दाचा अर्थ वाद्य,उपकरण,अवजार वगैरे आहे त्यापासून 'साजिंदा' किंवा 'साझिंदः' म्हणजे वाद्य वाजवून साथ करणारा; गाण्याला साथ म्हणून तबला, सारंगी, पेटी वगैरे वाजवणारा वादक, बजवैया! (स्वतंत्रपणे (सोलो) वाद्यवादन करण्यासाठी, (झ) हा शब्द वापरतात .'तबलानवाज़', 'सारंगी नवाज़' वगैरे) हिंदी मराठीत संस्कृत 'वाद्य वरून 'बाजा' हा शब्द आला आहे. तो 'साज'(साझ) सारखाच फारसीचा असावा, असे समजून फारसी व्याकरणानुसार 'साजिंदा' च्या धर्तीवर 'बाजिंदा' हा शब्द बनविण्यात आला असावा, मात्र ही करामत फक्त मराठीनेच केली. हिंदी - उर्दूने

तसा प्रयत्न केला नाही. हिंदी-उर्दूत (अरबी-फारसीत बाज, बाझ या शब्दाचे अनेक अर्थ आहेत. मात्र त्यांत गायन - वादनाशी संबंधित एकही अर्थ नाही. मराठीच्या या क्लृप्तीने फसून माधवरावानी 'बाझन्दा' या फारसी शब्दाला मुळात नसलेला 'बजवय्या' हा अर्थ चिकटविला. शब्दांचा हा चकवा भल्याभल्यांना चकवतो, हेच,खरे! 'बाजिंदा ' हा शब्द खूप जुना असावा, असे मोल्सवर्थच्या 'मराठी - इंग्लिश डिक्शनरी' या इ. स. १८३१ साली प्रकाशित झालेल्या शब्दकोशातील नोंदीवरून लक्षात येते. ह्या नोंदीत इतर सर्व अर्थ आलेले आहेत. परंतु 'बजवैया' हा अर्थ मात्र त्यात नाही, हे लक्षात घेण्यासारखे आहे. मोल्सवर्थने 'बाझिंद :' हा फारसी लिपीत कंसात, व्युत्पत्ती दाखविण्यासाठी दिलेला आहे. यावरून त्यालाही या फारसी शब्दाचा 'बजवैया' हा अर्थ कोठे आढळला नसावा. असे दिसते. याच कोशात 'बजवैया' हा शब्द 'बजवय्या', असा दिला असून तो हिंदीच्या 'बाजो(जू) निया' पासून आल्याचे त्याने नमूद केले आहे. (अर्थात त्या वेळी हिंदी व उर्दू या दोन्ही भाषांसाठी 'हिंदुस्तानी' हा समाईक शब्द वापरला जात असल्याने त्याने H. या इंग्रजी संक्षेपाचा वापर केला आहे.) तसेच हा शब्द 'अनकॉमन' (विरळा) असल्याचेही नमूद केले आहे. त्याचा अर्थ त्याने 'ए म्यूझिकल परफॉर्मर' असा दिला आहे. 'बाजो (जू)निया' हा शब्द हिंदी - उर्दूच्या कोशात सापडत नाही. बहुधा आता तो अप्रचलित झाला असावा अथवा प्रादेशिक बोलींमध्ये प्रचलित असावा, सारांश, बाजिंदा या शब्दाचा फारसीच्या 'बाझ (झि) न्दा' शी काही संबंध नसून, मराठीनेच 'बाजा' पासून तो बनविला असावा, असे दिसते.

'श्रीरघुवंश'. डॉ. केतकर मार्ग, पुणे ४११ ००४, फोनः ३४३ ५३९



---

## अजब प्रेमपत्र

चिनी तुर्कस्तानात एका मुलीने आपल्या प्रियकराला प्रेमपत्र पाठवल्याची नोंद आहे. तिचे प्रेमपत्र म्हणजे एका पिशवीत भरलेल्या काही वस्तू. चहाची वीट - म्हणजे तुझ्यासाठी चहासुद्धा सोडला. वाळलेले गवत आणि सुकलेला जर्दाळू - म्हणजे इतकी मी वाळले. एक लाल फळ, एक कोळशाचा तुकडा - म्हणजे इतकी मी लाजून वा जळून लाल होते. एक फूल आणि साखरेचा खडा - हे प्रियकराचे वर्णन. एक दगड - हेही त्याचेच बरे का? ससाण्याचे पीस आणि अक्रोडाचा गर - म्हणजे उडून येऊन तुला समर्पित व्हावंसं मला वाटतंय.

**(वैखरी - ले. अशोक रा. केळकर, मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४००००४. पृ. ९३ वरून)**

# ज्याची त्याची प्रचीती : भुसावळ

द.भि. कुळकर्णी

महाराष्ट्र एक्स्प्रेसमध्ये बसलो, की मी विदर्भवादी होतो, का नाही होणार ? गोंदियापासून कोल्हापूरपर्यंत पोचायला जर दोन-दोन दिवस लागायला लागले, तर का नाही होणार?

गाडी हलत होती. बाहेरची सृष्टी उलटच्या पावलाने धावत होती. हिरव्या आणि काळ्या रंगाच्या असंख्य छटा प्रगटत होत्या, काळपट हिरवा, पोपटी, काळा, सावळा, किरमिजी. या शब्दांत सापडू नये, अशा छटा-प्रवासात बसल्या-बसल्या, मी विचार करीत होतो. बहुतेकांना प्रवास का आवडतो? बदल घरकामांतून सुटका? खरे कारण वेगळेच असावे. घरी आपण हिंडत असतो आणि भोवतीच्या वस्तू स्थिर असतात. प्रवासात आपण स्थायी असतो, आणि भोवतीच्या पळत असतात.

माझ्यासमोर एक परदेशी बसली आहे. मजबूत बांधा. झुळझुळीत कपडे. मजबूत जबडचाचा रेखीव चेहरा. तिचे आणि तिच्या लहानग्याचे मुख्य काम म्हणजे अखंड आहार. भुसावळ आले, तेव्हा त्यांचे एक खाणे संपून दुसरे खाणे सुरू होत होते. त्यातून फुरसत काढून मुलाने विचारलें, 'कौनसा स्टेशन, है, मम्मी?' मम्मीने मान तिरपी करून पाहिले आणि म्हटले, 'भुस्सावल' मग थोडा वेळ दोघेही गप्प बसले. अचानक मुलाने विचारले, 'मम्मी, भुसावल का मतलब क्या है?' मी कान टवकारले उत्तराची उत्सुकतेने वाट पाहायला लागलो. बाईही थोडी विचारात पडलेली दिसली तिने इकडे तिकडे पाहिले, बाहेर कभिन्न काळे लोखंडाचे असंख्य नाग स्थिर राहून वळवळत होते. जागोजाग मालगाडचांचे आणि सवारी गाडचांचे डबे थबकले होते, धूळ आणि कोळशाची पूड दृष्टादृष्टावर पसरली होती. काय वाटलं कुणास ठाऊक, बाई एकदम उदगारली, 'अरे यहाँ कोयले का भुस्सा बिखरा है, इसलिए भुस्सावल' मी मनातल्या मनात हसलो खरा पण मला तरी उत्तर कुठे माहीत होते?

भुसावळबद्दल माझ्या मनात एक वेगळेच प्रेम आहे. या परिसरात माझे अनेक आप्तही. एदलाबाद तर माझे आजोळच आणि ही बाई सरळ म्हणते आहे, 'कोयले का भुस्सा है इसलिए भुस्सावल!' त्या काळी खरोखरीच भुसावळ कोयला धुळीने बरबटलेले असायचे. गाडी आऊटरपाशी येत नाही, तोच कोळसाचा जळका परिमल नाकात शिरायचा.

-पण तरीही भुस्सा आणि भुसावळ हे नाते मन मान्य करीत नव्हते. मग काय असेल या शब्दाची व्युत्पत्ती?

भरपूर विश्रांती घेऊन ग़ाडी त्या चिरलेल्या पोलादी सागवनातून बाहेर पॅडली बाहेर पाहावे, तर एकामागोमाग एक केळीचे न सुकलेले बाग. भरपूर पाणी आणि निगराणी. त्यामुळे जवळच्या इंजिनाच्या आचेला दाद न देणारे सोट अगणित हिरवे रावे सुपर्ण होऊन डुलत असलेले. गादी हलत होती उलटच्या पावलाने केळीचे बाग नागपूरच्या दिशेने धावत होते. काळचा हिरव्या रंगांचे नाना नमुने नजरेसमोरून वेगाने सकत होते. आता मातीचा रंग बदलत होता.

रंग हा एक वैतागच आहे. देशस्थ ज्याला गोरा म्हणतात, त्याला कोकणस्थ काळा म्हणतात. माझ्यापुरते मी शब्द निश्चित केले आहेत. काळा - सावळा गव्हाळ -उजळ-गोरा- पांढरा, कुठल्याही माणसाला मी या मात्रांमध्ये कुठेतरी बसवतो; हे अर्थात बरोबर नाही; पण काय करणार? निदान काळे-गोरेपणात गल्लत होऊ नये, इतपत ही स्केल उपयोगी आहेच.

भुसावळ सुटले, तसा मातीचा रंग बदलत गेला. काळा, मग सावळा, भुरका, मध्येच तपकिरी, पुन्हा सावळा. एकदम मेंदूमध्ये तिरपी वीज चमकली. भू श्यामल, सावळी भुई, वऱ्हाडची संत्र्याकपाशीची जमीन म्हणजे काळी पाचच. भुसावळपासून खानदेश सुरू होतो भाषेचे हेल बदलतात. तसे मातीचे पोतही बदलते, पूर्वी कुणातरी शहाण्या म्हाताऱ्याने म्हटले असेल, 'इथून काळीमाय संपते आन् सावळी भुई सुरू होते.' भू श्यामल. रेल्वे स्टेशनवर हिंदीमध्ये पाटीच होती, 'भूसाँवल'

जमिनीकडे शहरी माणसाचे फारसे लक्ष जात नाही (जमीन म्हटली, की त्याला भूखंड आठवतात) खेडयातल्या कास्तकाराची मात्र ती मायच असते. खानदेश-वऱ्हाडातील कास्तकार शेतजमिनीला माउली म्हणतात हे कळले, तेव्हा मला आई भेटल्याइतका आनंद झाला. पुन्हा एकदा कुठेतरी वीज चमकली, बायाबापड्या, कास्तकार मजूर ही मंडळी ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी यांना 'माउली' का म्हणतात, ते कळले; ज्ञानोबा विठोबाला माऊली का म्हणतात, तेही कळले.

**ए-वन, जंतरमंतर अमरावती मार्ग, नागपूर ४४००१०, दूरध्वनी - (०७१२) ५३२३३१७**



---

## सत्य

सत्य ह्या शब्दाचा अत्यंत व्यापक अर्थ उपनिषदांनी शिकवला आहे. सत्यामध्ये सर्व शास्त्रीय ज्ञान, नैतिक मूल्ये आणि व्यावहारिक प्रामाणिकपणा यांचा समावेश होतो.

**आचार्य स. ज. भागवत.**

# लेणे, की लेणी?

लीला अर्जुनवाडकर

भाषा आणि जीवनच्या दिवाळी १९९६ च्या अंकात 'लेणे' या शीर्षकाने दि.य.देशपांडे यांचे आजचा सुधारक (१९९४) मधील एक अवतरण दिले आहे. त्या संदर्भात हे पत्र.

'लेणे' या शब्दाचे दोन अर्थ आहेत. एक : डोंगरकपारी खोदून राहण्यासाठी तयार केलेली गुहा. (उदा., कार्ल्याचे लेणे) दोन : अलंकार. (उदा., देशीकार लेणे, बाळलेणे) हा शब्द बाह्यरूपाने एकच असला व दोन्हीही अर्थांनी तो नपुंसकलिंगीच असला, तरी अर्थतः त्याची व्युत्पत्ती वेगवेगळी आहे. 'कृत्रिम गुहा' या अर्थाने येणारा 'लेण' हा शब्द V ली > लयन (आश्रय, दडणे) यावरून आलेला आहे. विहार, अड्ढ्योग, पासाद, हम्मिय आणि गुहा या पाच प्रकारच्या निवासस्थानांचा समुच्चयात्मक निर्देश 'लेणे' (नपुं.) या एका शब्दाने विनयपिटकात केला आहे. (जिज्ञासूंनी र्‍हीस डेव्हिड्स व स्टीड यांच्या पाली इंग्रजी कोशातील 'लेण' या शब्दावरील टीप पाहावी.) मराठीत या शब्दाचा फक्त एकच अर्थ रूढ आहे. हाच अर्थ विभंग अट्ठकथेत दिलेला आढळतो.

उलट 'लेणे' म्हणजे 'दागिना' या अर्थाने येणारा शब्द 'लेपन (अंगाला लावणे, अंगावर धारण करणे) यावरून आलेला आहे, असे दाते - कर्वे यांच्या कोशात म्हटले आहे. त्यांनी 'रत्न' या शब्दावरून 'लेणे' हा शब्द सांगणारी पर्यायी= व्युत्पत्तीही दिली आहे.

प्राकृतीकरणाच्या प्रक्रियेत एकच शब्द दोन भिन्न भिन्न शब्दांवरून सिद्ध झाल्याची उदाहरणे नेहमी भेटतात. उदा., सुह > शुभ व सुख. वयण > वदन व वचन.

तेव्हा 'लेणे (म्हणजे कार्ल्याचे लेणे) हा शब्द मूळ 'अलंकार' या अर्थाचा आहे, हे दि. य. देशपांदे यांचे म्हणणे प्रामादिक आहे.

आता त्यांचा दुसरा मुद्दा. लेणे हा मूळचा नपुंसकलिंगी व अनेकवचनात 'लेणी' असे रूप घेणारा शब्द आजकाल 'ती लेणी' असा स्त्रीलिंगी एकवचनात वापरला जातो, हे चूक आहे. असा- एक तर भाषाव्यवहारात लिंग हे 'स्वतंत्र' म्हणजे अनिर्बंध असते. त्यामुळे प्राकृतीकरणाच्या ओघात किंवा एकाच भाषेत व एकाच काळातही लिंग पालटू शकते. त्याला समर्थनात्मक आधार काहीही नसतो. संस्कृतातला 'स्वप्नः' हा पुंलिंगी शब्द

मराठीत 'ते स्वप्न' असा नपुंसकलिंगी झाला आहे. आजकाल विद्यार्थी 'ती मनोरथे' (न-पुं.बहु.) असा शब्द सर्रास वापरतात, असा माझा अनुभव आहे.

शिवाय 'लेणे' (नपुं. या शब्दाचे 'लेणीं' (स्त्री.) असे ईकारांत रूप असण्यात काही बोलभाषेचा, प्रादेशिकतेचाही प्रभाव असणे शक्य आहे. उदा., ती भजी व त्या भज्या हा प्रयोग मी बेळगावकडच्या लोकांच्या तोंडी ऐकला आहे. खुद्द प्रमाण मराठीतही 'ते झोपडे' व 'ती झोपडी' असे प्रयोग आहेतच की. (उदा. 'त्या तिथे पलिकडे तिकडे माझिया प्रियेचे झोपडे - माडगूळकर. 'अंधुक शामल वेळ टेकडी झरा शेत तरु मधे झोपडी' - तांबे) ती भाकरी व त्या भाकऱ्या हे आणखी एक उदाहरण.

या अशा भिन्नलिंगी प्रयोगात एखादे वेळी आकारभेद किंवा कुत्साही अभिप्रेत असू शकते. पण हा मुद्दा प्रस्तुत संदर्भात गैरलागू आहे.

आणखी एक लहानसा मुद्दा. ईकारांत (किंवा मूळ संस्कृतातील इकारांत) स्त्रीलिंगी शब्द मराठीत अकारांत होण्याची प्रक्रियाही पुष्कळ रूढ आहे. उदा., बुद्धी, बुध. शुद्धी - शुद्ध/ सुध. रीती-रीत. मूर्ती- मूर्त. कीर्ती-कीर्त. नागर व ग्रामीण मराठीत अनुक्रमे भाकरी व भाकर अशी रूपे रूढ आहेत.

**देवांगिनी, ११९२, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ३, पुणे ४११००२.**

**दूरभाषा - ४७९४१९.**

❐❐

---

## लौकिक व्यवहारातील संस्कृत

बऱ्याच वेळा संस्कृत म्हणजे काय याची सामान्य जनांची एक विशिष्ट समजूत असते. जसे इंग्रजी म्हणजे 'येस फ्येस' असे काही तरी असते, कानडी म्हणजे 'यंडुगुंडु' असे काहीतरी असते. तसे संस्कृत म्हणजे 'अं अः' असे काही तरी असते. आमचे ॲनार्बरचे एंजिनीयर भटजी परवा सत्यनारायणाची पूजा सांगताना जिथे जिथे 'भवतु', 'अस्तु' इत्यादी शब्दांच्या जागी 'भवतुः' 'अस्तुः' वगैरे उच्चार करीत होते. या शब्दांपुढे विसर्ग त्यांच्या पोथीत कुठे छापलेला नव्हता, पण तो तिथे असला पाहिजे अशी त्यांची ठाम समजूत होती. शिवाय 'ताम् इह उपह्वये श्रियम्' या श्लोकातला 'ह्व' खोडून त्यांनी 'र व' अशी चुकीची दुरुस्ती करून ठेवली होती व 'उपरवये' असे अभूतपूर्व क्रियापद तयार केले होते.

**(संस्कृत आणि प्राकृत भाषा - ले. माधव मुरलीधर देशपांडे, शुभदा सारस्वत प्रकाशन, पुणे. पृ. १९२-१९३ वरून)**

# मराठीतील भाषाविषयक लेखन : १९९६

अनंतमूर्ती उडुपी रा. / इये भारती लेखन कळा / भाषा आणि जीवन / १४:३ पावसाळा १९९६ / पृ. ७ / अनुवाद : श्यामला वनारसे

अफझलखान / भाषांतर : मराठीतून उर्दूत / प्रतिष्ठान / ४३:५ सप्टेंबर - ऑक्टोबर १९९६ / पृ. ५१

अर्जुनवाडकर लीला / दोन पत्रे (साद आणि प्रतिसाद) / भाषा आणि जीवन / १४:४ दिवाळी १९९६ / पृ. ६०

आचार्य माधव ना. / कथन एकनाथांचे / भाषा आणि जीवन / १४:४ दिवाळी १९९६ / पृ. ६

आचार्य माधव ना. / कथन ज्ञानदेवांचे / भाषा आणि जीवन / १४:२ उन्हाळा १९९६ / पृ. ५

आवळीकर पंडित / 'वारी' आणि 'दिंडी' नवीन काही (शब्दायन) / भाषा आणि जीवन / १४:३ पावसाळा १९९६ / पृ. ५२

आपटे एन्. डी. / अशी ही इंग्रजी भाग १ / मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे / १९९६/ पृष्ठसंख्या १०६ / कि. रु. ७०/-

इंदापूरकर चं. द. / ज्ञानेश्वरांचे पसायदान : एक शैलीवैज्ञानिक अभ्यास / भाषा आणि जीवन / १४:१ हिवाळा १९९६ / पृ. ३८.

काळे कल्याण / अक्कलवंताला गरज नसते (संपादकीय) / भाषा आणि जीवन / १४:१ हिवाळा १९९६ / पृ. १

काळे कल्याण / वेड लागलेलं घर (संपादकीय) / भाषा आणि जीवन / १४:२ उन्हाळा १९९६ / पृ. १

कुलकर्णी मु. रा. / ज्ञानेश्वरीतील प्रक्षिप्त - अप्रक्षिप्त ओव्यांचा विचार / अनुबंध / २०:७९ ऑनोडि १९९६/ पृ. १९

कुलकर्णी राम / सभा जिंकणारी प्रभावी भाषणे कशी कराल? सानिका, नाशिक, पृष्ठ सं १५५ / मूल्य ५० रु.

केळकर अशोक / पुसलेली अवतरणचिन्हे (संपादकीय) / भाषा आणि जीवन / १४:४ दिवाळी १९९६ / पृ. १

केळकर अशोक स. / मध्यमा - भाषा आणि भाषाव्यवहार / मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे / १९९६ / पृष्ठसंख्या २८२ मूल्य १८० रु.

श्रीकृष्ण खडपेकर / भाषा आणि जीवनचे मुखपृष्ठ (साद आणि प्रतिसाद) / भाषा आणि जीवन / १४:४ दिवाळी १९९६ / पृ. ५५

खुपेरकर बाळाचार्य / श्री ज्ञानेश्वरीतील अपपाठांचे संशोधन / पैलतीर / दिवाळी १९९६ / पृ. ९७.

गवांदे राजाभाऊ/ ग्राम्यतेतील सामर्थ्याच्या निमित्ताने/ भाषा आणि जीवना १४.२ उन्हाळा १९९६ पृ. ५३.

गिते विलास (अनुवादक) / मराठी आणा आणि इंग्रजी हटवा / स्नेहवर्धन, पुणे / १९९६ / पृष्ठसंख्या ४४ / मूल्य २५ रु.

गुरव कृष्णा / श्री एकनाथ शुद्धीकृत ज्ञानेश्वरीवरील परिभाषा / पैलतीर / दिवाळी १९९६ / पृ. ७३.

गुंडी नीलिमा / शब्द : एक अस्त्र (भाषानिरीक्षण) / भाषा आणि जीवन / १४:४ दिवाळी १९९६ / पृ. ६४

गोडबोले ऋचा / एक भाषिक खेळ (ज्याची त्याची प्रचीती) / भाषा आणि जीवन / १४:२ उन्हाळा १९९६ / पृ. ५०.

घाणेकर मधुसूदन / हस्ताक्षरांचे अंतरंग / सुयोग प्रकाशन पुणे, १९९६ / पृ. १३२ / मूल्य ७० रु.

घारे दीपक / देवनागरी मुद्राक्षर कला - २ (पुनर्भेट) / भाषा आणि जीवन / १४:१ हिवाळा १९९६ / पृ. ४

जावरे अनिकेत (अनुवादक) / भाषांतरकाराचे कर्तव्य आणि उत्तरदायित्व (शार्ल बोदलेरच्या 'ताब्लो परिझियाँ' च्या जर्मन भाषांतराची प्रस्तावना (धन परक्याचे) मूळ लेखक : व्हॉल्टर बेन्यामिन / लेखांक १ आणि २ / भाषा आणि जीवन / १४:३ पावसाळा आणि १४:४ दिवाळी १९९६ / पृ. अनुक्रमे ३८ आणि ३४.

जोशी श्रीपाद / एक शब्दाचा पाठलाग (शब्दायन) / भाषा आणि जीवन / उन्हाळा १९९६ / पृ. ३७.

टिल्लू प्रतिभा / भाषा आणि साहित्य (नोबेल पारितोषिक स्वीकारताना टोनी मॉरिसन यांनी केलेल्या भाषणाचा मुक्त अनुवाद) / रुची / १८:५ जुलै १९९६ / पृ. ९

टिळक रत्नावली ना. / वेळ घालविण्याचा प्रकार (साद आणि प्रतिसाद) भाषा आणि जीवन / १४:२ उन्हाळा १९९६ / पृ. ५८

टिळक विद्यागौरी / अव्यवहार्य विचार (साद आणि प्रतिसाद) / भाषा आणि जीवन

/ १४:२ उन्हाळा १९९६ / पृ. ५९

ठाले पाटील कौतिकराव / मराठी संस्कृतीतील पुस्तक व्यवहार : आधार ढासळतो आहे! / रुची / ऑक्टोबर १९९६ / पृ. १९

तावरे स्नेहल / शुद्ध शब्दकोश / स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, १९९६ / मूल्य ४५ रु.

धडफळे मोहन / एक कसदार संशोधन (पुस्तक परीक्षण) / परीक्षित पुस्तक : शैलीशास्त्रज्ञ भामह, ले. वा. के. लेले, मानसन्मान प्रकाशन, पुणे १९९६ / भाषा आणि जीवन / १४:३ पावसाळा १९९६ / पृ. ५२.

धोंगडे रमेश / शैलीवैज्ञानिक समीक्षा / दिलीपराज प्रकाशन, पुणे / १९९६ / पृष्ठसंख्या २४३ / मूल्य १५० रु.

नगरकर रा. शं. / ज्ञानेश्वरी पाठचिकित्सा / आमची श्रीवाणी, धुळे / ४:१ जुलै १९९६ / पृ. १४४

परचुरे श्री. दि. / मराठी गद्यलेखन शैलीचा उद्गम आणि विकास / आशा परचुरे / पृष्ठसंख्या ३५७ / मूल्य २०० रु.

पंडित माया / भाषांतर : तौलनिक साहित्याभ्यासाचे माध्यम व मराठीतील भाषान्तरित साहित्य / आमची श्रीवाणी, धुळे / ४:१ जुलै १९९६ / पृ. ३१.

परुळेकर आशा / शाब्दिक कोड्यांच्या गमतीजमती / उन्मेष प्रकाशन / पृष्ठसंख्या ८८ / मूल्य ३० रु.

पाटील सुशीला / ज्ञानदेवांचा शब्दवेध / आमची श्रीवाणी, धुळे / ४:१ जुलै १९९६ / पृ. १३४.

पुंडलीक शैलेश सदाशिव / अर्थव्यक्ती, अर्थपूर्णत्व आणि भाषाशिक्षकांचे प्रश्न / भाषा आणि जीवन / १४:२ उन्हाळा १९९६ / पृ. २६.

पुंडलीक शैलेश सदाशिव / पदबंध विचार : स्वरूप, अंतःशिक्षा आणि त्याचे प्रमाणन काही पारिभाषिक संज्ञा आणि संकल्पना / भाषा आणि जीवन / १४:३ पावसाळा १९९६/ पृ. २५.

पुंडलीक शैलेश सदाशिव / भाषेची यदृच्छता / भाषा आणि जीवन / १४:४ दिवाळी १९९६ / पृ. २१.

पुंडलीक शैलेश / वामनाचा रीतिविचार : एक पुनर्मूल्यांकन / आमची श्रीवाणी, धुळे / ४:२ नोव्हेंबर १९९६ (प्रसिद्धी फेब्रुवारी १९९७) / पृ. २३.

पुंडलीक शैलेश सदाशिव / व्हॅलन्स थिअरी : एक प्रतिक्रिया (साद आणि प्रतिसाद) / भाषा आणि जीवन / १४:१ हिवाळा १९९६ / पृ. ५१

पुंडलीक शैलेश सदाशिव / ज्ञानप्रक्रिया आणि भाषाव्यवहार / भाषा आणि जीवन/ १४:१ हिवाळा १९९६ / पृ. १७.

पुंडे दत्तात्रय / सुलभ भाषाविज्ञान / स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, १९९६ / पृष्ठसंख्या/

किं. ७० रु.

बारचे गं. ग. / दिलासा : शैलीवैज्ञानिक रसग्रहण / महाराष्ट्र साहित्य पत्रिका / अंक क्र. २७७ एप्रिल-जून १९९६ / पृ. ८८

बेडेकर दि. के. / भाषेतील निषिद्धता (पुनर्भेट) / भाषा आणि जीवन / १४:४ दिवाळी १९९६ / पृ. ४३.

बेन्यामिन व्हॉल्टर / भाषांतरकाराचे कर्तव्य आणि उत्तरदायित्व (धन परक्याचे लेखांक १ आणि २ / शार्ल बोदलेरच्या 'ताब्लो परिझियाँ' च्या जर्मन भाषांतराची प्रस्तावना / अनुवादक अनिकेत जावरे / भाषा आणि जीवन / १४:३ पावसाळा आणि १४:४ दिवाळी १९९६ / पृ. अनुक्रमे ३८ आणि ३४.

बेलवलकर सुमन / एक उपयुक्त पुस्तक (पुस्तक परीक्षण) / परीक्षित पुस्तक : जर्मन भाषा शिकू या ले. प्रा. अविनाश बिनीवाले प्रकाशक : स्नेहल प्रकाशन, पुणे १९९४ / भाषा आणि जीवन) १४:२ उन्हाळा १९९६ / पृ. ६३.

बेलवलकर सुमन / सांस्कृतिक गरजा लक्षात घेऊन लिहिलेले भाषाध्यापन पुस्तक (पुस्तक परीक्षण) / परीक्षित पुस्तक : 'बंगाली शिका' ले. डॉ. अपर्णा झा, ॲड. हेम नारायण झा. प्रकाशक : नितीन प्रकाशन, पुणे ३०. १९९४, मूल्य ४० रु. भाषा आणि जीवन / १४:२ उन्हाळा १९९६ / पृ. ६६

भंडारी शांतिलाल / दूरचित्रवाणी : भोगवट्यासाठी, की शिणवट्यासाठी? (पुनर्भेट) / भाषा आणि जीवन / १४:३ पावसाळा १९९६ / पृ. ४६.

भागवत दीपक / उपयुक्त म्हणी / श्रीपाद प्रकाशन / पृष्ठसंख्या ५६ / मूल्य २० रु.

भाटे सरोजा / प्रसन्न शैलीतील शास्त्रगहन चर्चा (पुस्तक परीक्षण) / परीक्षित पुस्तक : संस्कृत आणि प्राकृत भाषाव्यवहार, नियमन आणि शास्त्रचर्चा, ले. माधव मुरलीधर देशपांडे, शुभदा सारस्वत, पुणे. १९९५ / भाषा आणि जीवन / १४:४ दिवाळी १९९६ / पृ. ६६

भिडे विद्याधर वा. / मराठी भाषेचे वाक्प्रचार आणि म्हणी (पुनर्मुद्रण) / उत्कर्ष प्रकाशन, पुणे / पृष्ठसंख्या ४३२ / मूल्य १०० रु.

भिर्डीकर ऊर्मिला (अनुवादक) / आपणही भाषांतर करू शकतो / मूळ ले. सुधाकर मराठे / भाषा आणि जीवन / १४:१ हिवाळा १९९६ / पृ. ३२.

मराठे सुधाकर / आपणही भाषांतर करू शकतो / भाषांतर : ऊर्मिला भिर्डीकर / भाषा आणि जीवन / १४:१ हिवाळा १९९६ / पृ. ३२.

माने वसुधा / सामान्य माणसाच्या दृष्टिकोनातून मराठी भाषेचा अभ्यास (ज्याची त्याची प्रचीती) / भाषा आणि जीवन / १४:३ पावसाळा १९९६ / पृ. ४९.

मांजरखेडे अशोक / मराठी मुद्द्यासाठी इंग्रजी कुबडी / रुची / ऑक्टोबर १९९६ / पृ. २५.

मुंडले आशा / जगात मराठीचा प्रभाव (संपादकीय) / भाषा आणि जीवन / १४:३ पावसाळा १९९६ / पृ. १

मोहनी दिवाकर पुरुषोत्तम / झापड कोणाच्या डोळ्यांवर आहे? (साद आणि प्रतिसाद) / भाषा आणि जीवन / १४:१ हिवाळा १९९६ / पृ. ५३.

मोहनी दिवाकर / भाषाविषयक निरीक्षणे (अंताजीची बखर) / रुची / १८:५ जुलै १९९६ / पृ. ७

मोहनी दिवाकर / भाषेचा गोवर्धन उचलायचा कसा? / रुची / ऑक्टोबर पृ. १९९६ / पृ. १५.

मोहनी दिवाकर / शुद्धलेखनाचे सुलभीकरण नको! / रुची / १८:४ एप्रिल १९९६ / पृ. ३

राईलकर मनोहर / भाषाभाषांतील उच्चारण - संकेत / साद आणि प्रतिसाद / भाषा आणि जीवन / १४:२ उन्हाळा १९९६ / पृ. ६०.

रामदास स्वामी / अभारतीय शब्दकोश / मनोरमा प्रकाशन, मुंबई / १९९६ / पृष्ठसंख्या २८४ / रु. १००

वनारसे श्यामला (अनुवादक) / इये भारती लेखनी कळा / मूळ ले. उडुपी रा. अनंतमूर्ती / भाषा आणिं जीवन / १४:३ पावसाळा १९९६ / पृ. ७

रानडे उषा / भाषा शिकवण्याचा एक धाडसी प्रयोग (पुस्तक परीक्षण) / परीक्षित पुस्तक : Marathi for Beginners : An Intensive Course in spoken Marathi : Dr. Bhalachandra Nemade प्रकाशक : श्री. बाबा भांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद १९९४ / भाषा आणि जीवन / १४:१ हिवाळा १९९६ / पृ. ६२.

विंदा करंदीकर / अव्यय ते एक सांडलेगा (पुनर्भेट) / भाषा आणि जीवन / १४:२ उन्हाळा १९९६ / पृ. ५२

शिंपी आर्. यू. / इंग्लिश मराठी टीचर / श्रीसमर्थ प्रकाशन / पृष्ठसंख्या ११२ / मूल्य ३०

श्याम विमल / पुणे सोडताना-परतीचा प्रवास (कविता) / भाषा आणि जीवन / १४:२ उन्हाळा १९९६ / पृ. ४७

सामंत सत्त्वशीला / कायद्याचा अनुवाद : गरज, त्यामधील अडचणी व उपलब्ध अनुवादांचे मूल्यमापन / भाषा आणि जीवन / १४:१ हिवाळा १९९६ / पृ. २५.

सामंत सत्त्वशीला / धुरिण, की धुरीण? (शब्दायन) / भाषा आणि जीवन / १४:४ दिवाळी १९९६

सामंत सत्त्वशीला / मराठीतून कायदा - अंमलबजावणी कोठवर? / रुची / ऑक्टोबर १९९६ / पृ. ५

❑❑

सूचनाफलक

# पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्यासंबंधीचे निवेदन, वृत्तपत्र आणि पुस्तके नोंदणी अधिनियम कलम डी १९ बी आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४ यांना अनुसरून

१. प्रकाशन स्थळ : पुणे, महाराष्ट्र

२. प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक : जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबरमध्ये.

३. मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : मृणालिनी शहा, भारतीय, १ शीतल अपार्टमेंट्स्, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४.

४. मुद्रणस्थळ : सहकार मुद्रणालय, ५४०, गणेश पेठ, पुणे २.

५. प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : मृणालिनी शहा, भारतीय, चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, पत्ता कलम ३ प्रमाणे.

६. संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता : कल्याण काळे, भारतीय, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७.

७. पत्रिकेच्या मालकाचे नाव, पत्ता : एकंदर भांडवलाच्या एक टक्क्याहून अधिक हिश्शाचे अधिकार किंवा भागधारक असल्यास त्यांची नावे व पत्ते :

मराठी अभ्यास परिषद, द्वारा : अशोक रा. केळकर, ७, धनंजय सोसायटी, ७५९/८३, शिवाजीनगर, पुणे ४११ ००४.

मी मृणालिनी शहा असे प्रतिज्ञापूर्वक सांगते की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

पुणे : ३० मार्च, १९९७ मृणालिनी शहा,

प्रकाशक

पुणे : ३० मार्च, १९९७

**मृणालिनी शहा,**

**प्रकाशक**

❑❑





अनुक्रमणिका

## पैसे भरण्याबद्दल सूचना :

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनिऑर्डर कूपनवर किंवा चेक सोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशा पोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी :

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

- चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.
- चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यासाठी वर्षाला ६० रु.
- सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षापैकी असो) १५ रु.
- परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.
- परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.
- सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

## परिषदेची वर्गणी :

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यापैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला. तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ : एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु. असे एकूण ६० रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी १०० डॉलर), हितचिंतकासाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी २५० डॉलर) किंवा जास्त, आश्रयदात्यांसाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त.

(आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर :

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पांन ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरण पृष्ठ चार १००० रु., आवरण पृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक : ०-४००४८९८५